# महाराष्ट्र विधानपरिषद

## दुसरे (पावसाळी) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### अतिरिक्त शिक्षकांना मा.उच्च न्यायालयांचे यांचे आदेशानुसार मुळ शाळेमध्ये रुजू करुन घेणेबाबत

**(१) ८१९३ (०४-०८-२०१५). श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) अतिरिक्त शिक्षक समावेशन प्रकियेस जैसे थे ठेवण्याचे मा.उच्च न्यायालयांचे आदेशाप्रमाणे शासनाने निर्णय घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सोलापूर, पुणे, सांगली, कोल्हापूर जिल्हयातील अतिरिक्त ठरलेल्या शिक्षकांना त्यांच्या मुळ शाळेवर रुजू करुन घेतले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) नसल्यास, या शिक्षकांना त्यांच्या मुळ शाळेमध्ये रुजु करुन घेणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.विनोद तावडे (०८-०३-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) हे अंशत: खरे आहे. ज्या शाळेमध्ये अतिरिक्त शिक्षक देण्यात आलेला होता. त्या शाळेच्या व्यवस्थापकांनी मा.उच्च न्यायालयामध्ये याचिका दाखल केली होती. सदर याचिकेत मा.न्यायालयाने जैसे थे चे आदेश दिल्याने अतिरिक्त शिक्षक त्या शाळांमध्ये रुजू होवू शकलेले नाहीत. अशा शिक्षकांना पुढील वर्षीच्या संच मान्यतेनुसार अन्य शाळेत समायोजन करण्यात आलेले आहे.

---

## राज्यातील खाजगी रुग्णालये व खाजगी अतिविशेषोपचार रुग्णालयांबाबतच्या आदर्श आचारसंहितेच्या प्रस्तावाबाबत

**(२) ११०१८ (२२-१२-२०१५). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील खाजगी रुग्णालये व खाजगी अतिविशेषोपचार रुग्णालयांबाबतचा आदर्श आचारसंहितेचा प्रस्ताव शासनाकडे प्रलंबित आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अनेक खाजगी रुग्णालय व खाजगी अतिविशेषोपचार रुग्णालयांमध्ये रात्रीच्या वेळी एकही निवासी तज्ञ डॉक्टर उपलब्ध राहत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, नागपूर शहरातील अनेक खाजगी रुग्णालयांच्या मुळ नकाशात वाहनतळाकरीता जागा आरक्षित दाखविण्यात आलेली असून प्रत्यक्षात त्या जागेवर रुग्णालयाने आपले अंतर्गत विभाग वा प्रतिक्षालये तयार केलेली आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) तसेच रुग्णालयात येणाऱ्या रुग्णांची वाहने वाहनतळाकरीता जागा उपलब्ध नसल्यामुळे रस्त्यावरच ठेवण्यात येत असल्याने छोटे मोठे अपघात होत आहेत, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.एकनाथ शिंदे (०८-०३-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२) हे खरे नाही.

(३) हे अंशत: खरे आहे. संबंधित म.न.पा. नगररचना यावर नियंत्रण ठेवण्यास सक्षम आहे.

(४) मनपा सक्षम प्राधिकरण असून सार्वजनिक आरोग्य विभागाकडे अपघाताची नोंद झाल्याचे दिसून येत नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

## मुंगोली (ता.वणी, जि.यवतमाळ) या गावाचे वेकोलीमध्ये होणाऱ्या स्पोटामुळे नुकसान झाल्याबाबत

**(३) १२७३९ (२१-१२-२०१५). श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **उद्योग मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंगोली (ता.वणी, जि.यवतमाळ) हे गाव चोहोबाजूंनी वेकोलीच्या विळख्यात सापडले असून वेकोलीमध्ये होणाऱ्या स्फोटामुळे मुंगोली गावातील नवनाथ दुर्गे, गणपत टेकाम यांच्यासह २० नागरिकांची घरे पडली याबाबतची माहिती वेकोली व महसूल प्रशासनाला देण्यात येऊनही कोणतीच कार्यवाही न झाल्याने गेल्या २० वर्षापासून येथील गावकरी भयभीत अवस्थेत गावात राहत असल्याचे दिनांक ११ सप्टेंबर, २०१५ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने वेकोलीच्या बेजबाबदारपणामुळे अनेकांवर आर्थिक संकट कोसळले असून सदर गावातील लोकांना नुकसान भरपाई वा आर्थिक मदत देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देसाई (२८-०३-२०१९) :** (१) हे खरे नाही.

वेस्टर्न कोलफिल्ड्स लिमिटेड यांच्या तर्फे गावकऱ्यांचा समावेश असलेली समिती स्थापन करण्यात आली होती. तथापि, समितीच्या पाहणी अहवालानूसार घरांची पडझड स्फोटामुळे झाली नसल्याचे निदर्शनास आले आहे.

(२) व (३) मुंगोली गावातील घरांची पडझड स्फोटामुळे झाली नसल्याचे निष्पन्न झाल्याने आर्थिक मदत देण्याचा प्रश्न उद्भवत नाही. तथापि, कोल बियरिंग ॲक्ट-१९५७ मधील कलम ९ (१) अन्वये मुंगोली गावातील जमिनीच्या अधिग्रहणाबाबत दिनांक २३/०३/२०१६ रोजी अधिसूचना निर्गमित झाली आहे. सध्य:स्थितीत मुंगोली गावाचे पुनर्वसन प्रस्तावित आहे.

---

## राज्यातील अपंगांना अपंगत्वाचे प्रमाणपत्र मिळण्यास विलंब होत असल्याबाबत

**(४) २१३७१ (१९-०८-२०१६). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.सतेज ऊर्फ बंटी पाटील :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील अपंगांना वेळेवर अपंगत्वाचे प्रमाणपत्र मिळण्यासाठी शासनाने तयार केलेली वेबसाईट वारंवार बंद पडत असल्यामुळे अपंगांना प्रमाणपत्र मिळण्यास विलंब होत असल्याचे माहे मे, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय,चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०५-०३-२०१९) :** (१) हे खरे आहे. या संबंधाने महाऑनलाईनकडे याबाबत सर्व्हर कपॅसिटी वाढविण्याबाबत पाठपुरावा करण्यात येत होता.

(२) शासन निर्णय, दिनांक १४/०९/२०१८ अन्वये केंद्र शासनाच्या www.swavalambancard.gov.in या संकेतस्थळावरून दिनांक २/१०/२०१८ पासून दिव्यांगत्व प्रमाणपत्र वितरीत करण्यात येत आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## ताडदेव (मुंबई) येथील जागा वाटपात गैरप्रकार झाल्याबाबत

**(५) २१५८० (०१-०९-२०१६). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.किरण पावसकर, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.जगन्नाथ शिंदे, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई पोलिसांच्या निवासस्थानाकरीता राखीव असलेल्या ताडदेव येथील एम.पी.मिल कम्पांऊंडमधील भूखंड वाटपात झालेल्या गैरप्रकाराची आर्थिक गुन्हे शाखेने चौकशी सुरु केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या चौकशीविषयी आर्थिक गुन्हे शाखेने म्हाडा व जिल्हाधिकारी यांना सतत पत्र व्यवहार केला तरी देखील काही प्रतिसाद मिळत नसल्याने शासनाने त्यांचेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) तसेच, पोलिसांच्या निवासस्थानाकरीता राखीव असलेल्या ताडदेव येथील भूखंडावर झोपडपट्टीवासियांनी केलेले अतिक्रमण निष्कासित करून त्याठिकाणी पोलिसांकरीता घरे बांधण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२१-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

सदर बाबत प्राथमिक चौकशी सुरु आहे.

(२) व (३) मलबार हिल येथील भूकर क्र. ७२५ मधील पोलीस विभागासाठी संपादित केलेल्या जमिनीपैकी ४.२६ हेक्टर जमीन ही झोपडपट्टींनी व्यापलेली असल्याने, महसूल व वन विभाग क्र. एलबीएल २५८८/प्र.क्र. ५४३/ग-८, दिनांक ०२/०२/१९८९ रोजीच्या शासन ज्ञापनाद्वारे वरील नमूद जमिनीची, झोपडपट्टीवासियांचे पुनर्वसन करण्यासाठी ३.३१ हेक्टर व पोलीस विभागासाठी ०.९५ हेक्टर, अशा दोन भूखंडांमध्ये आखणी करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. सदर ०.९५ हेक्टर जमिनीवरील झोपडपट्टीवासियांचे पुनर्वसन करण्यात आल्यानंतर म्हाडाने वरील ०.९५ हेक्टर जमीन मोकळी करुन मोकळ्या जमिनीचा ताबा पोलीस विभागास द्यावा, असे उक्त ज्ञापनात नमूद करण्यात आले आहे.

सुधारित विकास नियंत्रण नियमावलीच्या कलम ३३(१०) अन्वये अनुज्ञेय असलेले बांधिव आरक्षणापोटी पोलिसांना देय असलेल्या बांधकाम पूर्ततेनंतर नियमानुसार हस्तांतरीत करण्यात यावे, असे निर्देश दिलेले आहेत. या अनुषंगाने सदर योजनेच्या अभिन्यासातील इमारत क्र. १० ही पोलीस गृहनिर्माण करीता बांधण्यात येत आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ठाणे जिल्हाधिकारी कार्यालयावर शेतकऱ्यांनी काढलेला मोर्चा

**(६) २२४३९ (१७-०६-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे जिल्ह्यात शासनाचे चुकीचे धोरण शेतकऱ्यांच्या आत्महत्यांना कारणीभूत असल्याचा आरोप करीत शेतकऱ्यांनी जिल्हाधिकारी कार्यालयावर तिरडी मोर्चाचे आयोजन दिनांक ३० मे, २०१६ रोजी वा त्यासुमारास करण्यात आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मोर्चेकऱ्यांनी जिल्हाधिकाऱ्यांना निवेदन दिले आहे काय व त्यात कोणकोणत्या बाबींचा समावेश करण्यात आला आहे,

(३) असल्यास, त्यानुसार शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (३०-०३-२०१९) :** (१) होय. हे खरे आहे.

(२) होय. शासनाच्या विविध विभागांशी संबंधित २१ मागण्यांचा सदरहू निवेदनामध्ये समावेश आहे.

(३) महसूल व वन विभाग, क्र.एससीवाय-२०१५/प्र.क्र.३११/म-७, दिनांक २०/१०/२०१५ व दिनांक ९/११/२०१५ च्या शासन निर्णयान्वये सन २०१५-१६ च्या खरीप हंगामातील हंगामी पैसेवारी ५० पैशांपेक्षा कमी असलेल्या १५७४७ गावांमध्ये दुष्काळसदृश्य परिस्थिती जाहीर करण्यात आली होती व त्यानुषंगाने विविध उपाययोजना जाहीर करण्यात आलेल्या आहेत. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, शासन निर्णय क्र.कृकमा-०६१७/प्र.क्र.१२७/२-स, दिनांक २८ जून, २०१७ अन्वये “छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना-२०१७” नुसार राज्यातील शेतकऱ्यांना कर्जमाफी योजना लागू करण्यात आली आहे. तसेच सन २०१४-१५ पासून सन २०१८-१९ पर्यंत एकूण सुमारे रुपये १७००० कोटी पेक्षा जास्त रक्कम शेतकऱ्यांच्या मदतीसाठी वितरीत करण्यात आलेली आहे.

त्याशिवाय मदत व पुनर्वसन विभाग, सहकार व पणन विभाग, जलसंपदा विभाग, जलसंधारण विभाग, ऊर्जा विभाग अशा अनेक विभागांमार्फत शेतकऱ्यांच्या सक्षमीकरणासाठी विविध योजना राबविण्यात आलेल्या आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात वाहनांना स्पीड गव्हर्नर बसविण्याबाबत

**(७) २२७३१ (१६-०८-२०१६). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात मोठ्या प्रमाणात अपघात होत असल्याने वाहनांना स्पीड गव्हर्नर बसविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर विचाराधीन बाबीवरील शासनाचा निर्णय झाला आहे काय,
(३) असल्यास, त्यानुसार वाहनांना स्पीड गव्हर्नर बसविण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०८-०३-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) परिवहन संवर्गातील वाहनांना वेग नियंत्रक बसविण्याबाबत परिवहन आयुक्त कार्यालयाने दिनांक ०६/०५/२०१७ चे आदेशान्वये सर्व प्रादेशिक/उपप्रादेशिक परिवहन कार्यालयांना आदेश दिलेले आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## ग्रामीण भागातील प्राथमिक आरोग्य केंद्र व ग्रामीण रुग्णालय येथे आवश्यक औषधांचा पुरवठा करण्याबाबत

**(८) २२८१६ (२०-०८-२०१६). श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात सन नोव्हेंबर, २०१० मध्ये जन आरोग्य अभियानामार्फत ५ जिल्ह्यातील १० प्राथमिक आरोग्य केंद्र व ५ ग्रामीण रुग्णालयांतून उपलब्धता यावर एक अभ्यास करण्यात आला असल्याचे माहे एप्रिल, २०१६ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(२) असल्यास, या अभ्यासानुसार प्राथमिक आरोग्य केंद्रात सरासरी ५३ टक्के औषधांचा साठा शुन्य असल्याची माहिती समोर आली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, या अहवालाची दखल घेत शासनाने ग्रामीण भागातील प्राथमिक आरोग्य केंद्र व ग्रामीण रुग्णालय येथे आवश्यक औषधांचा पुरवठा करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे कोणती आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०८-०३-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) जन आरोग्य अभियानाच्या अहवालात असे नमूद करण्यात आलेले आहे.
(३) राज्यामध्ये दिनांक ७ मे, २०१३ पासून मोफत औषध योजना सुरु आाहे. शा.नि.दिनांक २६/०७/२०१७ अन्वये औषध खरेदीसाठी हाफकीन महामंडळ येथे स्वतंत्र खरेदी कक्ष स्थापन केला आहे. स्थानिक स्तरावर औषध खरेदीसाठी १०-२०% अनुदान वितरीत केले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मोहाडी (जि.धुळे) येथील ॲसिड कारखान्यातील ॲसिडची टाकी फुटल्याबाबत

**(९) २३१३३ (१६-०८-२०१६). श्री.आनंदराव पाटील, श्री.हरिसिंग राठोड :** सन्माननीय **कामगार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मोहाडी (जि.धुळे) येथे उपनगरात ॲसिड तयार करण्याचा कारखान्यातील ॲसिडची टाकी फुटल्याने परिसरातील नागरिकांमध्ये भितीचे वातावरण निर्माण झाले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर टाकी दुरुस्त करुन ही घटना वारंवार घडू नये यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (०८-०३-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.

दिनांक २२/०५/२०१६ रोजी मे.राज केमिकल्स वर्क्स, मोहाडी उपनगर ता.जि.धुळे येथे श्री.शेखर जोशी यांच्या राहत्या घरात /आस्थापनेत फिनाईल, लिक्विड सोप व सौम्य ॲसिड इत्यादी प्लॅस्टिक कॅनमध्ये भरण्याचे काम दोन कामगारांच्या सहाय्याने करत असताना प्लॅस्टिकच्या ॲसिड स्टोरेज टॅंकला तडा जाऊन हायड्रोक्लोरीक ॲसिड (३०%) जमिनीवर सांडले. तात्काळ अग्निशमन दलाच्या गाड्या बोलावून पाण्याचा मारा करण्यात आला व ट्रॅक्टरच्या सहाय्यने माती टाकण्यात आली व सदरील गळती झालेल्या ॲसिडवर नियंत्रण करण्यात आले.

(२) सदर घटनेनंतर सदरहू कारखाना पूर्णपणे बंद करण्यात आलेला आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पोलिसांनी खंडणी घेऊन विकासकाचा छळ केल्याबाबत

**(१०) २६११४ (०४-०१-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) खेड (जि.पुणे) तालुक्यातील आंबेठाण रोड येथील विकासक श्री.राजेंद्र घनवट यांचेवर चार खोटे गुन्हे दाखल करुन खंडणी घेतल्या प्रकरणी एसीबी, सीआयडी आणि विभागीय चौकशीची गेले दोन वर्षापासूनची सुरु असलेली कार्यवाही पूर्ण करण्यात आली नसल्याची निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यासंदर्भात लोकप्रतिनिधींनी माहे नोव्हेंबर, २०१५ पासून ते अद्यापपर्यंत दिलेल्या अनेक तक्रार निवेदनाची दखल घेवून तात्काळ कार्यवाही करण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२१-०२-२०१९) :** (१) व (२) या प्रकरणाची चौकशी दिनांक ९/१०/२०१५ रोजी राज्य गुन्हे अन्वेषण विभागाकडे सोपविण्यात आली होती. तथापि, अशाच स्वरुपाच्या तत्कालीन मा.गृहमंत्री यांच्याकडे केलेल्या दिनांक २३/४/२०१३ रोजीच्या तक्रारीची चौकशी लाचलुचपत प्रतिबंधक विभागाकडून करण्यात येत असल्याने पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई च्या दिनांक १३/२/२०१७ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तूत चौकशी महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, मुंबई यांचेकडे वर्ग केली आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## धामणगांव रेल्वे, चांदूर रेल्वे व नांदगाव खंडेश्वर तालुक्यातील सबस्टेशनला असलेल्या निवासस्थानच्या दुरुस्तीबाबत

**(११) २६२९२ (२७-०४-२०१२). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप** : सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) धामणगांव रेल्वे, चांदूर रेल्वे व नांदगाव खंडेश्वर तालुक्यातील सबस्टेशनला असलेल्या निवासस्थानच्या दुरुस्तीकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींनी मा.उपमुख्यमंत्री यांना दिनांक १९ ऑक्टोबर, २०११ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर निवेदनावर शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) अद्याप कोणतीच कार्यवाही करण्यात आली नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (१३-०३-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) व (३) धामणगांव रेल्वे, चांदूर रेल्वे, खंडेश्वर व देवगांव येथील निवासस्थानाच्या दुरुस्तीची रुपये ९,२६,९५८/- रकमेची कामे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीमार्फत करण्यात आली आहेत.

---

## ठाणे शिक्षणाधिकारी (माध्यमिक) यांनी रिक्त जागांची माहिती समायोजनाकरीता ऑनलाईन भरली नसल्याबाबत

**(१२) २६३९२ (१६-१२-२०१६). श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) ठाणे शिक्षणाधिकारी (माध्यमिक) यांनी समायोजनासाठी उल्हास विद्यालय, उल्हासनगर, ऐरोली माध्यमिक विद्यालय, ऐरोली इत्यादी अनेक शाळातील रिक्त जागांची माहिती शासनास ऑनलाईन भरली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सर्व रिक्त जागांची माहिती भरली नसल्यामुळे समायोजन करताना शिक्षकांना जवळचे पर्याय मिळाले नाहीत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन संबंधितावर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-०३-२०१९) :** (१) व (२) हे खरे नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सन २०१५ मधील दुष्काळी अनुदान मिळण्याबाबत

**(१३) २७६३० (१३-०४-२०१७). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्रीमती स्मिता वाघ, श्री.विनायकराव मेटे :** सन्माननीय **मदत व पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सन २०१५ मध्ये दुष्काळामुळे नुकसान झालेल्या बागायती व फळबागाधारक शेतकऱ्यांना अनुदान शासनाने मंजुर न केल्याने जिल्हयातील शेतकरी अडचणीत आले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अभेगाव (ता.माजलगाव, जि.बीड) तालुक्यातील शेतकऱ्यांना शासनाकडून ५० टक्के दुष्काळी व बागायती अनुदान मिळाले नसल्यामुळे स्थानिक ग्रामस्थांनी दिनांक १७ जानेवारी, २०१६ रोजी वा त्यासुमारास माजलगाव तहसिल कार्यालयासमोर उपोषण केले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सन २०१५ मधील खरीप हंगामाचे दुष्काळी अनुदानाकरिता कोरड वाहू, फळ पीक अनुदान त्वरित मिळावे याकरीता शासनाने लाभ क्षेत्राची अट वगळावी अशी मागणी माहे जानेवारी, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान भडगांव तालुक्यातील (जि.जळगांव) शेतकऱ्यांनी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने दुष्काळग्रस्त शेतकऱ्यांना अनुदान देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. चंद्रकांत पाटील (११-०४-२०१९) :** (१) हे खरे नाही.

महसुल व वन विभाग, शासन निर्णय दिनांक ३१ डिसेंबर, २०१५ अन्वये राज्यातील सन २०१५-१६ च्या दुष्काळसदृश्य परिस्थितीच्या अनुषंगाने बाधित झालेल्या १५७४७ गावातील खातेदारांना कृषि विषय मदत वाटप करण्यासाठी निविष्ठा अनुदानाकरीता एकूण रू.३५७८.४३ कोटी निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे. तद्नंतर बहुवार्षिक फळपिके व बागायत पिके यांच्या नुकसानीसाठी मदत वितरीत करण्यात आली आहे.
(२) शेतकऱ्यांनी दिनांक १७ जानेवारी, २०१६ रोजी माजलगाव तहसिल कार्यालयासमोर उपोषण केले हे खरे आहे.

अभेगाव, ता.माजलगाव, जि.बीड येथील २२६ शेतकऱ्यांना ४८६५.४०/- इतके अनुदान वाटप केलेले आहे.
(३) होय.
(४) महसुल व वन विभाग, दिनांक २२ मार्च, २०१६ च्या पत्रान्वये खरीप हंगामातील बागायती पिक म्हणजे विहिर किंवा विंधन विहीरीद्वारे सिंचीत झालेले क्षेत्रावरील पीक होय. धरणा खालील लाभक्षेत्रातील लाभार्थ्यांना/शेतकऱ्यांना दुष्काळाची मदत अभिप्रेत नसल्याचा निर्णय घेण्यात आला.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## इंदिरानगर जोगेश्वरी एस.आर.ए. सहकारी गृहनिर्माण संस्थेतील गैरव्यवहाराबाबत

**(१४) ३०८७२ (१४-०४-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण** : सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) इंदिरानगर जोगेश्वरी एस.आर.ए. सहकारी गृहनिर्माण संस्था मर्यादित मौज मजास जोगेश्वरी (पुर्व), मुंबई यास प्रकल्पामध्ये म्हाडा अधिकाऱ्यानी झोपडपट्टीधारकांना प्रमाणित करताना गैरव्यवहार केल्यामुळे म्हाडाचे ३० कोटी रुपयांचे नुकसान झाल्याची तक्रार दिनांक ६ डिसेंबर, २०१६ रोजी वा त्यासुमारास पोलीस महासंचालक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग यांच्याकडे लोकप्रतिनिधीने केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, तक्रारीचे सर्वसाधारण स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, त्यासंबंधी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-०२-२०१९)** : (१) होय.

(२) इंदिरानगर जोगेश्वरी एस.आर.ए. सहकारी गृहनिर्माण संस्था मर्यादित या झोपडपट्टी पुर्नवसन प्रकल्पासाठी झोपडपट्टीधारकांना प्रमाणित करताना म्हाडा अधिकाऱ्यांनी भ्रष्टाचार केला आहे. पन्नास झोपडपट्टीधारकांना बोगसपणे प्रमाणित करण्यात आले आहे. खोटी खरेदीखते, रद्द झालेली दुकानाची गुमस्ता लाईसन्स, खोटी प्रतिज्ञापत्रे झोपड्या अस्तित्वात नसताना सुध्दा झोपड्या अस्तित्वात आहेत असे दाखवुन सदर संस्थेच्या परिशिष्ट-२ मध्ये बोगस नावे समाविष्ट केली आहेत आणि त्यांना पात्र करुन घेतले आहे. याबाबत चौकशी आणि कारवाई करावी, असे तक्रारीचे सर्वसाधारण स्वरुप आहे.

(३) व (४) सदर अर्जातील तक्रारी प्रामुख्याने झोपडपट्टी पुनर्वसन योजनेशी संबंधित असल्याने लाचलुचपत प्रतिबंधक विभागाने सदर प्रकरण गृहनिर्माण विभागाच्या अंतर्गत असलेल्या शिखर तक्रार निवारण समितीपुढे वर्ग केले असून सदर प्रकरण समितीपुढे न्यायप्रविष्ट आहे.

---

## अडवली-भुतावली गावच्या परिसरात डेब्रिजद्‌वारे अनधिकृत भराव टाकल्याबाबत

**(१५) ३१६४१ (११-०८-२०१७). श्री.रविंद्र फाटक :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नवी मुंबई महानगरपालिका हद्दीतील अडवली-भुतावली (जि.ठाणे) गावच्या परिसरामध्ये मयुरेश सिम्पोनी कंपनीच्या जमिनीवर डेब्रिजद्‌वारे अनधिकृत भराव टाकण्यात आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, ठाणे तहसिलदार यांनी मयुरेश कंपनीला ४६,३७८ ब्रास अनधिकृत भराव टाकल्याप्रकरणी रुपये ६ कोटी ४९ लाख दंड भरण्याची नोटीस माहे फेब्रुवारी, २०१५ मध्ये वा त्यादरम्यान दिली आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी जाणीवपूर्वक दुर्लक्ष करणाऱ्या व दंड वसूल न करणाऱ्या अधिकाऱ्यांवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबनाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०३-२०१९) :** (१) व (२) अशी बाब निदर्शनास आली आहे.

(३) मौजे अडवली-भुतावली येथील स.नं.१ ते ८, १०,१२ ते २३, २५, २६, २८ ते ४०, ४२, ४३, ४४, ४५, ५१, ५३ ते ६९, ७४ ते ७७, ७९ ते ८८ या जमिनीमध्ये डेब्रिज मिश्रित घनकचऱ्याचा केलेला भराव हा मोठ्या प्रमाणात व विस्तृत असल्याने नेमके कोणत्या सर्व्हे नं.मध्ये करण्यात आला, याबाबतची तांत्रिक पध्दतीने तपासणी दिनांक १०/१/२०१९ रोजी जिल्हा खनिकर्म अधिकारी, ठाणे, अधिकार शुल्क निरीक्षक, ठाणे व भौगोलिक प्रणाली सहाय्यक, कोल्हापूर यांनी केली आहे. सदर तपासणीमध्ये उक्त जमिनीमध्ये एकूण २,५०,०२२ ब्रास इतका भराव असून त्यामध्ये मुरुम या गौणखनिजाचे परिमाण १०% आढळून आले आहे. त्याप्रमाणे एकूण २५००२.२ ब्रास मुरुम या गौणखनिजाच्या भरावाबाबत संबंधितांना नोटीस बजावून तदनंतर महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम,१९६६ चे कलम ४८(७) मधील तरतुदीनुसार कार्यवाही करणेची तजवीज ठेवली असल्याबाबत जिल्हाधिकारी, ठाणे यांना तहसिलदार, ठाणे यांनी कळविले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## पुणे येथील बलात्कार व मानवी तस्करी प्रकरणाचा तपास सीआयडीकडे सोपविण्याबाबत

**(१६) ३१७६० (११-०८-२०१७). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.हुस्नबानू खलिफे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे येथील बलात्कार व मानवी तस्करी प्रकरणाचा तपास या खटल्यात आरोपी असलेल्या पोलीस अधिकाऱ्यांकडून काढुन सीआयडीकडे सोपविण्याचे निदेश दिनांक ७ जून, २०१७ रोजी वा त्यासुमारास मा.मुंबई उच्च न्यायालयाने दिल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या गुन्हयातील आरोपांचे स्वरुप काय आहे व या प्रकरणी शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०५-०३-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) पिडीतीने दिलेल्या तक्रारी वरून विमानतळ पो.स्टे पुणे शहर गुरनं.७९/२०१६ भादंविक ३७६ डी, ३६३, ३२८, ३४२, ३१२, ३२३, ५०६ व बाल लैंगिक अत्याचार प्रतिबंधक अधिनियम कलम ४,६,१२ व पिटा ॲक्ट कलम ४, ५, ६ अन्वये ९ आरोपीविरूध्द गुन्हा दाखल करण्यात आला असून त्यापैकी ७ आरोपीना अटक करण्यात आली आहे.

चंदननगर पो. स्टे येथे गुरनं ४६/२०१६ भादंवि क्र ३७६, ५११, ३२८, ३५४, ३२३, ५०६, ३४ अन्वये ४ आरोपीविरूध्द गुन्हा दाखल केलेला आहे.

तसेच, मा.उच्च न्यायालयाने दिनांक ७/६/२०१७ रोजी दिलेल्या निर्देशान्वये पुढील तपास गुन्हे अन्वेषण विभाग यांचे मार्फत सुरू आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## लोकप्रतिनिधीने रस्त्याच्या कामाच्या देयकासाठी कंत्राटदारास पैशाची मागणी केल्याबाबत

**(१७) ३४६४९ (१५-०९-२०१७). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) आर्णीचे लोकप्रतिनिधी श्री.राजू तोडसाम यांनी यवतमाळ जिल्ह्यातील घाटंजी तालुक्यातील एका रस्त्याच्या कामाच्या देयकासाठी कंत्राटदार श्री.शर्मा यांच्याकडे पैशाची मागणी केल्याबाबतचे संभाषण उघडकीस येवून त्याबाबतची तक्रार मा.मुख्यमंत्री यांच्याकडे दिनांक ८ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी मा.मुख्यमंत्री यांनी चौकशीचे आदेश दिले आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, तद्नुसार दोषींवर कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२१-०२-२०१९) :** (१), (२) व (३) आर्णीचे लोकप्रतिनिधी यांनी रस्त्याच्या कामासाठी कंत्राटदार यांच्याकडे सदर कामासाठी पैशाची मागणी केली असल्याबाबतचे प्रकरण लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, यवतमाळ यांच्याकडे पुढील आवश्यक ती कार्यवाही करण्यासाठी पाठविले होते. त्यावर पोलीस अधिक्षक, लाचलुचपत प्रतिबंधक विभाग, यवतमाळ यांनी सदर प्रकरणी प्राथमिक चौकशी केली असून, चौकशीअंती सदर प्रकरणात कोणतेही तथ्य नसल्याचे आढळून आल्याचे त्यांनी स्पष्ट केले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

___

## वाडा (जि.पालघर) तालुक्यातील छेडा स्पेसीलीटईझ फूड प्रा.लि. कंपनीवर कारवाई करण्याबाबत

**(१८) ३६५३२ (०२-०१-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **पर्यावरण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वाडा (जि.पालघर) तालुक्यातील मनोर-वाडा रस्त्यावर असलेल्या छेडा स्पेसीलीटईझ फूड प्रा.लि. कंपनीतील प्रदूषण व सांडपाण्यामुळे अंभई गावातील तसेच परिसरातील शेतकरी व नागरीकांना त्रास होत असल्याची तक्रार ग्रामस्थांनी तहसिलदार, वाडा यांना दिनांक २२ सप्टेंबर, २०१७ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदनाद्वारे केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन छेडा स्पेसीलीटईझ फूड प्रा.लि. कंपनीतील प्रदूषणावर कार्यवाही करुन सदर निवेदनानुसार संबंधित कंपनीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.रामदास कदम (०५-०३-२०१९) :** (१) होय.

(२) तक्रारीच्या अनुषंगाने केलेल्या पाहणीमध्ये आढळून आलेल्या त्रुटीच्या अनुषंगाने या कारखान्यास दिनांक २०/११/२०१७ रोजी अंतरिम आदेश बजावण्यात आले. अंतरिम निर्देशाचे वेळेत पालन न केल्यामुळे दिनांक २/६/२०१८ रोजी कारखान्यास बंदचे निर्देश दिले आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुणे जिल्ह्यातील प्राथमिक आरोग्य केंद्रामधील डॉक्टर रजेवर असल्याबाबत

**(१९) ३६९४९ (०२-०१-२०१८). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुणे जिल्ह्यातील ९६ प्राथमिक आरोग्य केंद्रामधील ४८ डॉक्टर विविध कारणांनी वर्षभरापासून रजेवर असल्याने रुग्णांची गैरसोय होत असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व तद्नुसार रजेवर असलेल्या डॉक्टरांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१५-०३-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

९६ प्राथमिक आरोग्य केंद्रातील ४७ वैद्यकीय अधिकाऱ्यांची पदे पदव्युत्तर अभ्यासक्रमासाठी गेल्यामुळे, सेवानिवृत्ती वा राजीनामा यामुळे रिक्त असून केवळ ७ वैद्यकीय अधिकारी अनधिकृतरित्या गैरहजर आहेत.
(२) ज्या प्राथमिक आरोग्य केंद्राच्या ठिकाणी दोन वैद्यकीय अधिकारी कार्यरत आहेत तेथील एक वैद्यकीय अधिकारी, ज्या प्रा.आ. केंद्राच्या ठिकाणी एकही वैद्यकीय अधिकारी उपलब्ध नाही त्या ठिकाणी पाठवून त्यामार्फत स्थानिक जनतेस आरोग्य सेवा सुविधा पुरविण्यात येत आहे. त्याप्रमाणे संबंधित तालुका आरोग्य अधिकारी याबाबतचे संनियंत्रण करीत असून सर्व ठिकाणी किमान एकतरी वैद्यकीय अधिकारी उपलब्ध होईल याची दक्षता घेण्यात येत आहे. त्यामुळे स्थानिक रुग्णांना आरोग्य सेवा सुविधा उपलब्ध होत असल्याने त्यांचे हाल होत नाहीत. तसेच ७ अनधिकृत गैरहजर वैद्यकीय अधिकाऱ्यांपैकी ०४ वैद्यकीय अधिकाऱ्यांना कारणे दाखवा नोटीस बजावण्यात आले असून अन्य वैद्यकीय अधिकाऱ्यांवर कार्यवाही प्रस्तावित करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई महानगरपालिका अंतर्गत माध्यमिक शाळांतील शिक्षकांना टी.ई.टी बंधनकारक केल्याबाबत

**(२०) ३७६०९ (०३-०१-२०१८). श्री.श्रीकांत देशपांडे, श्री.दत्तात्रय सावंत :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई महानगरपालिका अंतर्गत माध्यमिक शाळांतील इयत्ता ९ वी व १० वी च्या वर्गांना शिकविणाऱ्या शिक्षकांना टी.ई.टी. उत्तीर्ण करण्याचा आग्रह केला जात असून इयत्ता ९ वी व १० वी च्या वर्गांना शिकविणाऱ्या शिक्षकांना टी.ई.टी. आवश्यक असल्याबाबत कोणतेही शासन आदेश नाहीत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, माहितीचा अधिकार, २००९ च्या कायद्याप्रमाणे टी.ई.टी. फक्त इयत्ता १ ली ते ८ वी पर्यंतच्या वर्गांना शिकविणाऱ्या शिक्षकांनाच आवश्यक आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन इयत्ता ९ वी व १० वी ला शिकविणाऱ्या शिक्षकांसाठी टी.ई.टी. परिक्षेची व्यवस्थाच नसताना व कायद्यांतर्गत कोणतीही पूर्व अट नसताना होत असलेल्या दुराग्रहाबद्दल कार्यवाही करुन टी.ई.टी. बंधनकारक ठरविणाऱ्या अधिकाऱ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०८-०३-२०१९) :** (१) शैक्षणिक वर्ष २०१३-१४ च्या दरम्यान विनाअनुदानित माध्यमिक शाळांमधील इ.८ वी चे वर्ग माध्यमिक विभागाशी ९ वी व १० वी च्या वर्गांना संलग्नित होते. पद भरतीच्या वेळी ज्या शिक्षकांची भरती इ.८ वी च्या वर्गाचा पट विचारात घेऊन केलेली होती, अशा शिक्षकांना नियमित नियुक्ती देण्यापूर्वी शिक्षक पात्रता परीक्षा उत्तीर्ण असणे अनिवार्य आहे.
(२) बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिकार अधिनियम, २००९ मधील तरतूदीनुसार प्राथमिक शिक्षकांकरीता (इ.१ ली ते ८ वी) शिक्षक पात्रता परीक्षा अनिवार्य करण्यात आलेली आहे.
(३) व (४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नाशिक येथे नाट्यगृह बांधण्याबाबत

**(२१) ३७९१३ (०६-०४-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **सांस्कृतिक कार्य मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नाशिक येथील कुसुमाग्रज प्रतिष्ठान नाट्यगृहासह वृद्धींगत करणे आणि नाशिक येथे सिडकोमार्फत नाट्यगृह बांधण्यासाठी दिनांक २७ ऑगस्ट, २००९ रोजीच्या नियोजन विभागाच्या शासन निर्णयामध्ये मान्यता देण्यात आलेली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त कामांना मान्यता मिळूनही नाट्यगृहाची कामे सुरु करण्यात आली नसल्याचे माहे जानेवारी, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नाट्यगृहाची कामे सुरु करण्यासाठी काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (१५-०४-२०१९) :** (१) होय. खरे आहे.
(२) व (३) नाही. हे खरे नाही.
नियोजन विभागाच्या सदर शासन निर्णयान्वये कुसुमाग्रज प्रतिष्ठान नाट्यगृहासह वृद्धींगत करण्यासाठी मान्यता देण्यात आली होती. परंतू सदर प्रतिष्ठान सिडकोमार्फत बांधण्यात आले नसून, या विभागाच्या दि.२१ मार्च, २०११ च्या शासन निर्णयाअन्वये रु.२,००,५६,८८०/- रकमेस दिलेल्या प्रशासकीय मान्यतेनुसार सन २०११ ते सन २०१३ या कालावधी दरम्यान रु.१.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला. कुसुमाग्रज प्रतिष्ठानचे काम पूर्ण झाले आहे. तथापि, कुसुमाग्रज नाट्यगृह अशी वास्तू नसून कुसुमाग्रज स्मारकात बहुउद्देशीय असे दालन असून त्यात हौशी, प्रायोगिक नाट्य संस्था तिथे नाट्यप्रयोग करतात.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## रत्नागिरी जिल्ह्यातील प्राथमिक आरोग्य केंद्रात वैद्यकीय अधिकाऱ्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(२२) ३९०३५ (०४-०४-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, ॲड.राहुल नार्वेकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.अनिल भोसले, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रत्नागिरी जिल्ह्यात ६७ प्राथमिक आरोग्य केंद्रात १३१ वैद्यकीय अधिकाऱ्यांची पदे मंजूर असताना प्रत्यक्षात केवळ ६० वैद्यकीय अधिकारी कार्यरत आहेत, हे खरे आहे काय,

(२) तसेच, रत्नागिरी-मुंबई-गोवा महामार्गावर वसलेल्या लांजा तालुका ग्रामीण रुग्णालयात वैद्यकिय अधिकारी, कर्मचाऱ्यांच्या रिक्त पदांमुळे व अपुऱ्या वैद्यकीय सेवा सुविधांच्या अभावामुळे तालुक्यातील गावांमधून येणाऱ्या रुग्णांची मोठ्या प्रमाणात गैरसोय होत असल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, रुग्णालयातील ऑपरेशन थिएटर, एक्स रे मशीन, इ.सी.जी. मशीन बंद असणे, ब्लड बँकही या ठिकाणी नसल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, त्यामुळे येथील उपस्थित अधिकाऱ्यांवर कामाचा ताण व रुग्णांची गैरसोय होत आहे, हे ही खरे आहे काय,
(५) असल्यास, यामुळे शासनाने येथील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या रिक्त पदाचा आढावा घेवून ही पदे भरण्याबाबत व ग्रामीण जनतेला वैद्यकिय सुविधा देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०६-०३-२०१९) :** (१) हे खरे आहे.
(२) हे अंशत: खरे आहे.

ग्रामीण रुग्णालय, लांजा येथे वैद्यकीय अधिकारी गट-अ ते गट-ड संवर्गाची एकूण २८ पदे मंजूर असून १५ पदे भरलेली व १३ पदे रिक्त आहेत. सदर रुग्णालयातील कार्यरत अधिकारी व कर्मचारी हे उपलब्ध साधनसामुग्री व यंत्रसामुग्री यांचा आवश्यकतेनुसार वापर करुन तात्काळ आरोग्य सुविधा उपलब्ध करुन देत आहेत.
(३) हे अंशत: खरे आहे.

ग्रामीण रुग्णालय लांजा येथील ऑपरेशन थिएटरच्या स्लॅब दुरुस्तीचे बांधकाम सुरु असून प्रगतीपथावर आहे. सदर रुग्णालयातील एक्स रे मशीन व इसीजी मशीन सुरु आहे. निकषानुसार सदर रुग्णालयास ब्लड बँक मंजूर नाही.
(४) हे खरे नाही.
(५) वैद्यकीय अधिकारी गट-अ (ग्रेड पे रुपये ५४००/-) संवर्गातील ८७७ रिक्त पदे भरण्याबाबत दिनांक २७/१२/२०१८ रोजी जाहिरात प्रसिध्द केली असून पुढील कार्यवाही सुरु आहे.

---

## राज्यातील बंद साखर कारखान्यांच्या अहवालाबाबत

**(२३) ३९१४२ (०३-०४-२०१८). श्री.चंद्रकांत रघुवंशी, प्रा.अनिल सोले :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील बंद, मोडकळीस आलेल्या व अवसानात निघालेल्या सरकारी साखर कारखान्यांची मालमत्ता भाडेतत्वावर चालविण्यास देण्यासंबंधित धोरण निश्चित करण्यासाठी शासन निर्णय, दिनांक ४ सप्टेंबर, २०१७ अन्वये साखर आयुक्तांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त समितीचा अहवाल शासनास प्राप्त झाला आहे काय, सदर अहवालाच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०७-०३-२०१९) :** (१) होय.

(२) शासन निर्णय, दिनांक ०४/०९/२०१७ अन्वये साखर आयुक्त यांच्या अध्यक्षतेखालील समितीचा अहवाल प्राप्त झाला आहे. त्यानुसार राज्यातील बंद सहकारी साखर कारखान्यांना कार्यक्षेत्रात असणारी ऊस उपलब्धता, कारखान्यांच्या मशिनरीची सद्य:स्थिती, कारखान्याकडे असलेली एकूण देणी, कारखाना भाडेतत्वावर / भागीदारी तत्वावर चालविण्यास देण्यासाठी प्रतिसाद व उपलब्ध पर्याय ह्या बाबी तपासून निर्णय घेण्यासाठी मा.मंत्री (सहकार) यांनी दिनांक ९/९/२०१८ रोजी सर्व संबंधितांची बैठक घेतली. त्यावेळी बंद कारखाने सुरू करण्यासंदर्भात विविध उपाययोजना करून सदर बंद कारखाने सुरू करण्याबाबत सकारात्मक चर्चा झाली. त्यानुसार पुढील कार्यवाही साखर कारखान्यांच्या स्तरावर सुरू आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## सेनगाव (जि.हिंगोली) तालुक्यातील प्राथमिक आरोग्य केंद्रात वैद्यकीय अधिकाऱ्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(२४) ३९१६८ (०४-०४-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सेनगाव (जि.हिंगोली) तालुक्यातील प्राथमिक आरोग्य केंद्रात वैद्यकीय अधिकाऱ्यांची १२ पदे मंजूर असून यापैकी ६ पदे रिक्त आहेत, हे खरे आहे काय,

(२) तसेच जनतेच्या आरोग्यसेवेसाठी असलेल्या आरोग्य केंद्राची अवस्था अतिशय दयनीय असून त्यामुळे रुग्णांना आरोग्य केंद्रात योग्य त्या सुविधा मिळत नाहीत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले, त्यानुषंगाने सदर आरोग्य केंद्रात वैद्यकीय अधिकाऱ्यांची रिक्त पदे भरण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०६-०३-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

हिंगोली जिल्ह्यातील सेनगांव तालुक्यात एकूण ४ प्राथमिक आरोग्य केंद्रे व २ आरोग्य पथके कार्यान्वित आहेत. सदर ६ आरोग्य संस्थांसाठी वैद्यकीय अधिकारी, गट-अ (ग्रेड पे रुपये ५४००/-) संवर्गाची एकूण १२ पदे मंजूर असून ८ पदे भरलेली व ४ पदे रिक्त आहेत.

(२) हे खरे नाही.

(३) व (४) राज्यातील म.वै.आ.से., गट-अ (ग्रेड पे रुपये ५४००/-) संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्यांची ८७७ रिक्त पदांची जाहिरात दिनांक २७/१२/२०१८ रोजी प्रसिध्द करण्यात आली असून पुढील कार्यवाही सुरु आहे.

---

## राज्यात पर्यटकांसाठी पायाभूत सुविधा उभारण्याबाबत

**(२५) ४०१९६ (०४-०४-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **पर्यटन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) देशात वैद्यकीय पर्यटनासाठी येणाऱ्या एकूण पर्यटकांपैकी ५५ टक्के पर्यटक राज्यात येत असून त्यांना लागणाऱ्या पायाभूत सुविधांवर भर देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, वैद्यकीय पर्यटकांना रुग्णालयाच्या आवारात निवासी व्यवस्था, दुभाषक आणि टूरिस्ट गाईड या सुविधा व इतर सुविधा उपलब्ध करून देण्यात येणार आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (०२-०३-२०१९) :** (१), (२) व (३) राज्यात आरोग्य पर्यटनाला चालना देण्यासाठी सर्वंकष धोरण आखण्यासाठी शासनाच्या वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या दिनांक १३/०८/२०१३ च्या शासन निर्णयान्वये समिती गठीत करण्यात आलेली आहे. याशिवाय पर्यटन विभागामार्फतही दिनांक ४/०५/२०१६ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या पर्यटन धोरण २०१६ नुसार वैद्यकीय पर्यटन धोरण करण्याची कार्यवाही सुरु आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील वरिष्ठ डॉक्टरांसह कर्मचाऱ्यांची रिक्त पदे भरण्याबाबत

**(२६) ४१८२८ (०२-०८-२०१८). श्री.जयंत पाटील, श्री.प्रसाद लाड, श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.आनंदराव पाटील, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.जनार्दन चांदूरकर, आर्कि.अनंत गाडगीळ, श्री.हरिसिंग राठोड, श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.सुभाष झांबड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात आरोग्य संचालनालयाचा सर्व कारभार हंगामी तत्वावर सुरू असून, राज्यातील वरिष्ठ डॉक्टरांसह कर्मचाऱ्यांची १८१८१ पदे रिक्त असून आरोग्य संचालक, सह संचालक, उपसंचालक, सहाय्य संचालक, जिल्हा शल्य चिकित्सक वर्ग अ च्या एकूण १६५४ पदांपैकी १०४४ पदे भरण्यात आली नाहीत, हे ही खरे आहे काय,

(२) असल्यास, दिनांक ३१ मे, २०१८ अखेरपर्यंत आरोग्य विभागातील ४०० वरिष्ठ डॉक्टर निवृत्त होत आहेत, आरोग्य विभागातील जिल्हाचिकित्सकांच्या ६४३ मंजूर पदांपैकी ३७७ पदे रिक्त असल्याने तसेच कंत्राटी कर्मचाऱ्यांच्या काम बंद आंदोलनामुळे राज्यात आरोग्य सेवेवर विपरीत परिणाम झाला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, राज्यातील आरोग्य विभागात विविध संवर्गातील असंख्य पदे मागील अनेक वर्षापासून रिक्त असल्याने राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान व शहरी आरोग्य अभियान या दोन्ही विभागाकडे दुर्लक्ष झाल्याने व अस्तितत्वात असलेल्या अपुऱ्या डॉक्टर व अन्य कर्मचाऱ्यांना अनेक समस्यांना सामोरे जावे लागत असून राज्यातील विशेषेकरून गोरगरीब आदिवासींना आरोग्य सेवेपासून वंचित रहावे लागत आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, राज्यातील गोरगरीब, आदिवासी दुर्गम व डोंगराळ भागातील जनतेस चांगल्या आरोग्य सेवा व सुविधा मिळण्यासाठी आरोग्य विभागातील सर्व रिक्त पदे विनाविलंब भरण्याच्यादृष्टीने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (०७-०३-२०१९) :** (१) हे अंशत: खरे आहे.

आरोग्य सेवा संचालनालयातर्गंत दिनांक ३१/०५/२०१८ अखेर गट-अ ते गट-ड संवर्गातील मंजूर, भरलेली व रिक्त पदांचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | प्रवर्ग | मंजूर पदे | भरलेली पदे | रिक्त पदे |
|---|---|---|---|---|
| १ | म.वै.आ.से गट-अ (वर्ग-१) | १६५३ | ५९१ | १०६२ |
| २ | म.वै.आ.से गट-अ (वर्ग-२) | ७७८९ | ६१५० | १६३९ |
| ३ | म.वै.आ.से गट-ब | १२१६ | ७५२ | ४६४ |
| ४ | सा.रा.से. गट-ब | ९३३ | २९० | ६४३ |
| ५ | गट-क | ३०९०३ | २२४८८ | ८४१५ |
| ६ | गट-ड | १४०२८ | ८९८१८ | ४२१० |
| | एकूण | ५६५२२ | ४००८९ | १६४३३ |

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,गट-अ मधील पदे पदोन्नतीने तसेच नामनिर्देशनाने भरण्याची कार्यवाही सुरु आहे.

(२) हे अंशत: खरे आहे.

आरोग्य सेवा संचालनालयातर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (ग्रेड पे रुपये ५४००) व त्यावरील वैद्यकीय अधिकाऱ्यांचे सेवानिवृत्तीचे वय ५८ वरुन ६० वर्षे ५ वर्षासाठी (दिनांक ३१/०५/२०२३ पर्यंत) वाढविण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे. त्यानुसार त्याबाबतचा शासन निर्णय, दिनांक २९/०८/२०१८ रोजी निर्गमित करण्यात आला आहे. त्यामुळे महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (ग्रेड वेतन रुपये ५४०० व त्यापेक्षा अधिक) मधील ज्या अधिकाऱ्यांचे वय ५८ पेक्षा कमी आहे ते अधिकारी वयाच्या ६० वर्षापर्यंत शासन सेवेत राहतील.

जिल्हा शल्यचिकित्सक संवर्गात खुल्या प्रवर्गातील ५९ पदावर पदोन्नतीने नियुक्त्या देण्यात आल्या आहेत.

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत कार्यरत कंत्राटी कर्मचारी यांनी काम बंद आंदोलन केले होते. तथापि, या बंदमध्ये राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत कार्यरत तांत्रिक कंत्राटी कर्मचारी सहभागी झाले नसल्यामुळे त्याचा राज्यातील आरोग्य सेवेवर परिणाम झालेला नाही.

(३) हे खरे नाही.

राज्याच्या आरोग्य विभागातील गट-अ ते गट-ड संवर्गातील एकूण ५६५२२ मंजूर पदांपैकी ४००८९ पदे भरलेली आहेत. तसेच राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत कंत्राटी कर्मचारी कार्यरत आहेत. त्यामुळे गोरगरीब आदिवासींना आरोग्य सेवा कार्यरत अधिकारी व कर्मचारी यांचेमार्फत पुरविण्यात येत आहे.

(४) महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ (ग्रेड पे रुपये ६६००) मधील जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा आरोग्य अधिकारी व विशेषज्ञ संवर्गातील रिक्त पदे भरण्यासाठी सदर पदे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेतून ३ वर्षासाठी (दिनांक ३०/०९/२०२१ पर्यंत) वगळून ती निवडमंडळामार्फत भरण्याबाबत शासनाने निर्णय घेतला आहे. त्यानुसार सदर पदे निवडमंडळामार्फत भरण्याची कार्यवाही सुरु आहे. तसेच महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील पदोन्नतीच्या वाटयावरील पदे भरावयाची कार्यवाही सुरु आहे.

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा गट-अ (ग्रेड पे रुपये ५४००) मधील वैद्यकीय अधिकाऱ्यांची ७२३ पदे भरण्यासाठी जाहिरात देण्यात आली आहे. तसेच सद्य:स्थितीत सदर पदे ११ महिन्याच्या कालावधीसाठी कंत्राटी पध्दतीने भरण्याबाबत उपसंचालक आरोग्य सेवा यांना संचालनालय स्तरावरुन कळविण्यात आले आहे.

तसेच गट-क व गट-ड संवर्गातील रिक्त पदे भरण्याची कार्यवाही उपसंचालक स्तरावर सुरु आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## बडूर, बामणी, रुद्रापूर (ता.बिलोली, जि.नांदेड) येथील ग्रामस्थांनी शेतात ये-जा करण्यासाठी पाणंद रस्ता खुला करुन देण्याबाबत

**(२७) ४२०५० (०२-०८-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.जनार्दन चांदूरकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) बडूर, बामणी, रुद्रापूर (ता.बिलोली, जि.नांदेड) येथील ग्रामस्थांनी शेतात ये-जा करण्यासाठी पाणंद रस्ता खुला करुन देण्याची मागणी अनेक वेळा संबंधित तहसिलदार कार्यालयाकडे केली होती, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यानुषंगाने तहसिलदारांनी भूमी अभिलेख कार्यालयाकडे संबंधित नागरिकांना नोटीसा बजावून अहवाल सादर करण्याचे कळविले असूनही याबाबत संबंधित अधिकाऱ्यांनी कार्यवाही केली नसल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) तसेच सदरहू मागणी ही तीन गावातील सीमेवरील पाणंद रस्त्याची असताना संबंधित अधिकारी पैशाची मागणी करीत असून ग्रामस्थांची दिशाभूल करीत आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने पाणंद रस्ता खुला करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०९-०४-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) तहसिलदार, बिलोली यांनी दिनांक ०४/१२/२०१७ व दिनांक २६/०३/२०१८ रोजीच्या पत्रान्वये मंडळ अधिकारी सगरोळी/आदमपूर यांना नियमानुसार संबंधितांना नोटीस देवून अतिक्रमण हटवून घेण्याबाबत कळविले आहे.

तसेच, उपअधिक्षक, भूमि अभिलेख बिलोली यांच्या दिनांक ०३/०२/२०१८ रोजीच्या पत्रान्वये अर्जदार यांना सरकारी मोजणी शुल्क भरणा करुन हद्द कायम करण्याबाबत सूचित करण्यात आले. तसेच, त्यानंतर अर्जदाराच्या दिनांक १५/०३/२०१८ रोजीच्या पत्राच्या अनुषंगाने उपअधिक्षक, भूमि अभिलेख यांनी त्यांच्या दिनांक १२/०४/२०१८ रोजीच्या पत्रान्वये सदरच्या पाणंद रस्त्याची मोजणी मूळ भूमापनाच्या वेळी झालेली नसल्याने मोजणी करता येत नसल्याने जरुर तर रस्त्यांच्या दोन्ही बाजू कडील शेतकऱ्यांनी मोजणी शुल्क भरणा करुन आपआपल्या शेतगट नंबरची हद्दी कायम करुन घेणे उचित होईल, असे कळविले आहे.
(३), (४) व (५) सदरहू मागणी ही तीन गावातील सीमेवरील पाणंद/शिव रस्त्यांची आहे.

संबंधितांनी आजतागायत मोजणी शुल्काचा भरणा न केल्याने मोजणी झालेली नाही.

---

## मुंबईसह राज्यात ब्रिटीश काळापासून अस्तित्वात असलेल्या 'सायरन' ची दैनावस्था झाल्याबाबत

**(२८) ४२१३८ (०२-०८-२०१८). श्री.अमरनाथ राजूरकर, श्री.शरद रणपिसे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईसह राज्यात ब्रिटीश काळापासून अस्तित्वात असलेल्या 'सायरन' ची दैनावस्था झाली असल्याचे दिनांक १४ मार्च, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदशर्नास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, पूर्वी आणिबाणीची परिस्थिती उद्भवल्यास नागरिकांना सावध करणाऱ्या सायरनची आजही तेवढीच आवश्यकता असूनही अर्ध्याहून अधिक सायरन विनावापर असून त्यांच्या देखभालीच्या नावाखाली नागरी संरक्षण दलात लाखो रुपयांचा गैरव्यवहार होत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती आवश्यक कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०३-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात विशेषत: नागपूर व पुणे शहरात खाजगी ट्रॅव्हल्स कंपनीकडून प्रवाशांची होणारी लूट रोखण्याबाबत

**(२९) ४२३७५ (०२-०८-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.अनिल भोसले, श्री.अमरिशभाई पटेल, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.रामनिवास सिंह, श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात विशेषत: मुंबई, पुणे व नागपूर शहरात खाजगी ट्रॅव्हल्स बस कंपन्या दिवाळी, होळी, नाताळ, गणपती आणि उन्हाळ्याच्या सुट्टीच्या कालावधीत प्रवासी भाडेवाढ करुन प्रवाश्यांकडून तिप्पट-चौपट भाडे आकारुन प्रवाशांची लूट करीत असल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, याबाबत ४० तक्रारी परिवहन विभागाकडे प्राप्त झाल्या आहेत, खाजगी वाहतूकदारांनी प्रवाशांकडून जास्तीत जास्त किती भाडे घ्यावे याविषयीचे परिपत्रक काढल्यानंतर प्रवाशांकडून जादाचे भाडे आकारणाऱ्या आठ खाजगी वाहतूकदारांवर परिवहन विभागाने कारवाई केली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर खाजगी ट्रॅव्हल्स कंपनीने शहराच्या मुख्य रस्त्यावर कार्यालये उभारुन रस्त्याच्या दुतर्फा खाजगी ट्रॅव्हल्स उभी करत असल्याने रस्त्यावर वाहतुकीकोंडी होत असून प्रवासी वाहतुकीस अडथळा निर्माण होत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने प्रवास भाडेवाढ करुन प्रवाशांची लूट करणाऱ्या खाजगी ट्रॅव्हल्स

कंपनीवर व अशा खाजगी ट्रॅव्हल्स कंपनीच्या भाडेवाढीवर नियंत्रण न ठेवणाऱ्या परिवहन विभागाच्या अधिकाऱ्यांवर कारवाई करुन खाजगी प्रवासी भाडे नियंत्रणात ठेवण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (०८-०३-२०१९) :** (१), (२), (३) व (४) खाजगी बस चालकांकडून एसटी बस भाडेदराच्या तुलनेत दिड पटीपेक्षा जास्त भाडे आकारले गेल्याच्या ७६ तक्रारीं प्राप्त झाल्या. त्यापैकी ०२ प्रकरणात तसे निदर्शनास आलेले आहे. खाजगी बसच्या मनमानी भाडे आकारणीबाबत महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाचे त्या त्या टप्पा वाहतूकीचे भाडेदर विचारात घेऊन खाजगी कंत्राटी परवाना वाहनाचे त्या संवर्गासाठी संपूर्ण बससाठी येणाऱ्या प्रती कि.मी. भाडे दराच्या ५० टक्के पेक्षा अधिक राहणार नाही, असे कमाल भाडेदर दिनांक २७/०४/२०१८ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेले आहे.

जादा भाडेवाढ रोखण्यासाठी खाजगी कंत्राटी वाहनांच्या बुकींगच्या जागी भेट देण्याचे व कारवाई करण्याबाबतचे तसेच खाजगी बस मालकांनी पूर्ण बससाठी आकारावयाचे महत्तम भाडेबाबतचा तक्ता तयार करून त्याप्रमाणे येणारा प्रती आसन दर दर्शवून सदर खाजगी कंत्राटी वाहने ज्या ठिकाणाहून सुटतात, अशा ठिकाणी प्रवाशांच्या माहितीसाठी प्रदर्शित करण्याबाबतचे आदेश सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी व सर्व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी यांना देण्यात आलेले आहेत व त्याप्रमाणे प्रदर्शित करण्यात आले आहेत. खाजगी बस चालकांकडून एसटी बस भाडेदराच्या तुलनेत ५० टक्के पेक्षा जास्त भाडे आकारल्याबाबतच्या एकूण ०२ प्रकरणी कारवाई करण्यात आली असून रुपये ९,४००/- इतका दंड वसूल करण्यात आलेला आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पनवेल, उरण तसेच ठाणे जिल्हयातील वेल्हापूर पट्ट्यातील प्रकल्पग्रस्तांनी केलेली बांधकामे नियमित करणेबाबत

**(३०) ४२६२२ (०२-०८-२०१८). श्री.बाळाराम पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नवी मुंबईच्या उभारणीसाठी शासनाने '१२.५० टक्के स्किम' योजनेंतर्गत रायगड जिल्ह्यातील पनवेल व उरण तसेच ठाणे जिल्ह्यातील वेल्हापूर पट्ट्यातील ९५ गावांच्या जमिनी संपादन केल्या आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर प्रकल्पग्रस्त शेतकऱ्यांना १९७० सालापासून गावठाण विस्ताराची कोणतीही योजना शासनाने राबविली नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर प्रकल्पग्रस्तांनी नैसर्गिक गरजेपोटी केलेली बांधकामे नियमित करणेसाठी शासनाचे धोरण काय असून सिडकोने शासनाकडे बांधकामे नियमित करणेबाबत प्रस्ताव पाठविला आहे काय,
(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२६-०२-२०१९) :** (१) हे खरे आहे.

नवी मुंबई प्रकल्पासाठी ठाणे आणि रायगड जिल्ह्यातील ठाणे, पनवेल व उरण या तालुक्यामधील ९५ गावातील अधिसूचित जमिनींच्या विकासासाठी महाराष्ट्र प्रादेशिक आणि नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम ११३ (३)(ए) अन्वये नवीन शहर विकास प्राधिकरण सिडको महामंडळाची स्थापना करण्यात आली आहे.

(२), (३) व (४) सिडको महामंडळाने नवी मुंबई प्रकल्पाच्या विकासासाठी संपादित जमिनीच्या प्रकल्पग्रस्तांना दिलासा देण्याच्या दृष्टीकोनातून शासनाने दिनांक ०६/०३/१९९० व दिनांक २८/१०/१९९४ च्या शासन निर्णयान्वये १२.५% योजना मंजूर करण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत आजपर्यंत ८०% प्रकल्पग्रस्तांना विकसित भूखंडांचे करण्यात आले असून सदर जमिनीवर विकास प्रकल्प राबविण्याची कार्यवाही सुरु आहे.

गावठाण व गावठाण विस्तारित क्षेत्रामधील प्रकल्पग्रस्तांचे बांधकाम नियमितीकरणासह नियोजनबध्द विकास हा समूह विकास योजनेच्या माध्यमातून प्रस्तावित आहे. समूह विकास योजना (cluster scheme) राबविण्याच्या अनुषंगाने सूचना व हरकतीसाठी महाराष्ट प्रादेशिक व नगर नियोजन अधिनियम १९६६ चे कलम ३७(१अेअे) अन्वये दिनांक ०४/०३/२०१४ रोजी सूचना प्रसिध्द करण्यात आली असून याबाबत वैधानिक कार्यवाही पूर्ण

झाली आहे. याबाबत मा.मुंबई उच्च न्यायालयाकडील जनहित याचिका क्रमांक ६१/२०१४, दिनांक ९ जून, २०१७ रोजी निकाली काढल्याने यांसदर्भातील न्यायालयाचा अंतिम निर्णय घेण्यास असलेला प्रतिबंध राहिलेला नाही. सबब, यासंदर्भात अंतिम अधिसूचना निर्गमित करण्याची बाब विचाराधीन आहे.

तसेच नवी मुंबईतील प्रकल्पग्रस्तांनी गरजेपोटी केलेल्या बांधकामाचे अनुषंगाने धारण केलेल्या क्षेत्राचे सर्व्हेक्षण जिल्हाधिकारी, रायगड यांच्या मदतीने करणेबाबत सिडको महामंडळास दिनांक १६/०३/२०१७ च्या पत्रान्वये निर्देशानुसार संबंधित जिल्हाधिकारी यांचेमार्फत सर्व्हेक्षणाची कार्यवाही सुरु आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात समृध्द महाराष्ट्र जनकल्याण योजना व अहिल्यादेवी सिंचन विहिरी कार्यक्रमांतर्गत विहिरींची कामे अपूर्ण असल्याबाबत

**(३१) ४२६७५ (०१-०८-२०१८). श्री.प्रकाश गजभिये, ॲड.निरंजन डावखरे, श्री.रामराव वडकुते, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात समृध्द महाराष्ट्र जनकल्याण योजना व अहिल्यादेवी सिंचन विहिरी कार्यक्रमांतर्गत ७६ हजार ६८९ विहिरींची कामे प्रलंबित असल्याची बाब माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली असून मराठवाडा, विदर्भ व कोकण विभागात किती विहिरींची कामे दिनांक ३० मे, २०१८ रोजीपर्यंत पूर्ण करण्यात आली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, निधीची उपलब्धता असूनही सिंचन विहिरींची कामे झालेली नाहीत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, त्यापैकी किती विहिरींची कामे अर्धवट स्थितीत आहेत व अर्धवट स्थितीत असलेल्या विहिरींची कामे किती कालावधीत पूर्ण करण्यात येणार आहेत,

(४) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अर्धवट असलेल्या विहिरींची कामे पूर्ण करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (२५-०३-२०१९) :** (१) राज्यात समृध्द महाराष्ट्र जनकल्याण योजना व अहिल्यादेवी सिंचन विहिर योजनेंतर्गत मार्च, २०१८ अखेर १,१६,०४० पैकी ५४,००९ विहिरींची कामे पूर्ण झाली असून ६२,०३१ विहिरींची कामे अपूर्ण होती. तद्नंतर एप्रिल, २०१८ ते जून, २०१८ या कालावधीमध्ये या विहिरी पूर्ण करण्यासाठी विशेष मोहिम राबविण्यात आली होती. जून, २०१८ अखेर ६२,०३१ पैकी ३१,६६८ विहिरींची कामे पूर्ण करण्यात आली असून ३०,३६३ विहिरींची कामे प्रगतीपथावर आहेत. तद्नुसार, दिनांक २५/२/२०१९ पर्यंत १,००,९६४ सिंचन विहिरींची कामे पूर्ण झाली असून १५,०७६ सिंचन विहिरींची कामे प्रगतीपथावर आहेत.
(२) अंशत: खरे आहे.

सिंचन विहिर पूर्ण करण्याचा अपेक्षित कालावधी २ वर्षे आहे. परंतु, स्थानिक परिस्थिती व कुशल कारागिरांच्या कमतरतेमुळे याकरीता अधिक कालावधी लागतो.
(३) सद्य:स्थितीत १५,०७६ विहिरींचे कामे अपूर्ण असून ती जून, २०१९ अखेरपर्यंत पूर्ण करण्यात येतील.
(४) अर्धवट असलेल्या विहिरींची कामे पूर्ण करण्यासाठी जिल्हास्तरावर व तालुकास्तरावर आढावा घेऊन पूर्ण करण्याबाबत सतत पाठपूरावा सुरु आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात माध्यमिक वर्गाच्या गटामध्ये क्रीडा शिक्षकांचा समावेश करण्याबाबत

**(३२) ४२७३२ (०१-०८-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात माध्यमिक वर्गाच्या गटामध्ये क्रीडा शिक्षकांचा समावेश न करता त्यांना प्राथमिक पदवीधर वर्गात टाकुन शासनाने माध्यमिक क्रीडा शिक्षक हद्दपार केल्याचे माहे एप्रिल, २०१८ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शाळेच्या प्रार्थनेपासून विद्यार्थ्यांना शिस्त लावणे, शाळेच्या तक्रारी सोडविणे, विद्यार्थ्यांच्या खेळाचा सराव घेणे, त्यांची तयारी करणे आदि कामे क्रीडा शिक्षक करीत असल्याने महाराष्ट्र मागील अनेक वर्षापासून शालेय राष्ट्रीय स्पर्धेत पहिल्या तीन क्रमांकावर आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सन २०१६-१७ च्या संचमान्यतेमध्ये क्रीडा शिक्षकांचा माध्यमिकच्या वर्गाला अध्यापन करणाऱ्या गटात समावेश करण्यात आला नाही तर प्राथमिक पदवीधर गटामध्ये समाविष्ट करण्यात आल्याने क्रीडा शिक्षकांना पदवीधरची पदावनात केलेली श्रेणी मिळणार किंवा अतिरिक्त ठरणार आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अनुदानित शिक्षक आणि विनाअनुदानित स्वयंअर्थसहाय्यीत शाळेतील शिक्षक शिक्षण व्यवस्थेपासून कायमचे हद्दपार होऊ नये याकरिता कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री. विनोद तावडे (२६-०२-२०१९) :** (१) हे खरे नाही.

(२) होय. हे खरे आहे.

(३) व (४) सेवेत असणाऱ्या शिक्षकांना विद्यमान श्रेणी अनुज्ञेय आहे. तसेच मंजुर पदांमध्ये कार्यभारानुसार शारिरिक/क्रीडा शिक्षक पद अनुज्ञेय राहणार आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## भटक्या विमुक्त समाजाच्या विकासासाठी स्वतंत्र धोरण आखण्याबाबत

**(३३) ४२९८० (०१-०८-२०१८). श्री.शरद रणपिसे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.आनंदराव पाटील, ॲड.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.जनार्दन चांदूरकर, श्री.सुभाष झांबड, श्री.अमरनाथ राजूरकर, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.चंद्रकांत रघुवंशी :** सन्माननीय **विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) भटक्या विमुक्त समाजाच्या विकासासाठी स्वतंत्र धोरण आखण्याचे शासनाच्या विचाराधीन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, याबाबत निर्णय घेण्यात आला आहे काय, निर्णयाचे स्वरुप काय आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०६-०३-२०१९) :** (१), (२), (३) व (४) विमुक्त जाती, भटक्या जमाती समाजाच्या आर्थिक उन्नतीसाठी विशेष योजना राबविण्याचा निर्णय मा.मंत्रिमंडळाने दिनांक १५/०१/२०१९ रोजीच्या मंत्रिमंडळ बैठकीत घेतला आहे. त्यानुसार योजना राबविण्याबाबत कार्यवाही सुरु आहे.

---

## हिंगोली जिल्हयात मग्रारोहयो योजनेंतर्गत कामे हाती घेण्यात आल्याबाबत

**(३४) ४३२४८ (०१-०८-२०१८). श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **रोजगार हमी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हिंगोली जिल्हयात मग्रारोहयो योजनेंतर्गत दिनांक ३१ मे, २०१८ पर्यंत किती कामे हाती घेण्यात आली व या कामांवर किती मजूरांची संख्या होती,

(२) असल्यास, तालुकानिहाय मजूरांची संख्या किती आहे व किती कामे पूर्ण करण्यात आली आहेत,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.जयकुमार रावल (०२-०३-२०१९) :** (१) हिंगोली जिल्ह्यात दिनांक १ एप्रिल, २०१७ ते दिनांक ३१ मार्च, २०१८ अखेर ३९११ कामे हाती घेण्यात आली होती. त्या कामावर ४०३५७ मजुरांना काम उपलब्ध करुन देण्यात आले होते. तसेच दिनांक १ एप्रिल, २०१८ ते दिनांक ३१ मे, २०१८ अखेर २६८८ कामे हाती घेण्यात आली होती. त्या कामावर ३०३५३ मजुरांना काम उपलब्ध करुन देण्यात आले होते.

(२) तालुकानिहाय मजुरांची संख्या आणि कामे खालीलप्रमाणे :-

| अ. क्र. | तालुका | दि.१ एप्रिल, २०१७ ते दि.३१ मार्च, २०१८ | | पूर्ण कामांची संख्या | दि.१ एप्रिल, २०१८ ते दि.३१ मे, २०१८ | | पूर्ण कामांची संख्या |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | मंजूर उपस्थिती | कामांची संख्या | | मंजूर उपस्थिती | कामांची संख्या | |
| १ | हिंगोली | १०५३४ | ९०१ | २६० | ८९६५ | ६७२ | ०१ |
| २ | औंढा (ना) | ११२६९ | १०६३ | २८४ | ८५९८ | ७७७ | २२ |
| ३ | कळमनूरी | ९२४१ | ८३२ | २०२ | ५४९८ | ५४१ | ८२ |
| ४ | सेनगाव | ६१७५ | ६८६ | ४६ | ५६४२ | ५१३ | १० |
| ५ | वसमत | ३१३८ | ४२९ | ३० | १६५० | १८५ | १० |
| | एकूण | ४०३५७ | ३९११ | ८२२ | ३०३५३ | २६८८ | १३० |

(३) प्रश्न उद्भवत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

## सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी येथे शाखा अभियंताच्या बदल्यांबाबत

**(३५) ४३५८३ (०२-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी येथे शाखा अभियंताच्या बदल्यांचे आदेश माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निघाले आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, यात कोणकोणत्या अभियंत्यांच्या बदल्या करण्यात आल्या आहे, सदरील बदली आदेशानुसार किती अभियंते बदलीच्या ठिकाणी रुजू झाले आहे, तसेच किती अभियंते बदलीच्या ठिकाणी अद्यापही गेले नाहीत,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२६-०२-२०१९) :** (१) होय.

(२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांच्या दिनांक ३१/५/२०१८ च्या आदेशान्वये १० शाखा अभियंता व ४ कनिष्ठ अभियंता व दिनांक १२/६/२०१८ च्या आदेशानुसार २ शाखा अभियंता यांच्या बदल्या रत्नागिरी जिल्हयातर्गत करण्यात आल्या आहेत. तसेच शासनाच्या दिनांक १८/५/२०१८ च्या आदेशान्वये १ शाखा अभियंता यांची बदली रत्नागिरी जिल्हयातर्गत करण्यात आली आहे.

उपरोक्त आदेशानुसार बदली करण्यात अभियंते हे ज्या मंडळात कार्यरत आहेत, त्या मंडळ कार्यालयातील जवळपास ५०-६० पेक्षा अधिक अभियंत्यांची पदे रिक्त आहेत. सदरची वस्तुस्थिती विचारात घेता बदली आदेशान्वये बदली करण्यात आलेल्या अभियंत्यांना सोपविण्यात आलेली अर्थसंकल्पीय कामे, अंतिम टप्प्यात असलेली कामे पूर्णत्वास आल्यानंतर तसेच जिल्हा नियोजन विकास समितीकडील कामे पूर्ण झाल्यानंतर या अभियंत्यांना तातडीने कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करण्यात येत आहे.

(३) प्रश्न उदभ्‍ावत नाही. रत्नागिरी जिल्ह्यातील रिक्त पदे सन २०१९ च्या नियतकालीक बदल्यांमध्ये भरण्याची कार्यवाही करण्यात येईल.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## वांद्रे शासकीय वसाहतीतील इमारतीची दुरुस्ती निधीअभावी रखडल्याबाबत

**(३६) ४४६०६ (३०-११-२०१८). श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्री.धनंजय मुंडे, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर** : सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम वगळून) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वांद्रे (पूर्व) येथील शासकीय वसाहतीच्या इमारती ५० वर्षापेक्षा जुनी व जीर्ण झालेली असल्याने सदरहू दुरवस्थेत असलेल्या इमारतीत वास्तव्य करीत असलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांच्या जीवाला धोका निर्माण झाल्याचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदरहू जीर्ण व दुरवस्थेत असलेल्या धोकादायक इमारतीची दुरुस्ती न करण्याची कारणे काय आहेत,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदरहू इमारतीची दुरुस्ती करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२६-०२-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.

(२) व (३) वांद्रे येथील शासकीय वसाहतीच्या तीन चौकामधील जीर्ण व दुरवस्थेत असलेल्या ३६ इमारती रिक्त करण्यात आलेल्या असून या इमारती पाडून त्या ठिकाणी नवीन बहूमजली १२ इमारती बांधकामास रुपये २९६.१२ कोटी किंमतीस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर काम अर्थसंकल्पात समाविष्ट करण्यात आले असून निविदा प्रक्रिया प्रगतीपथावर आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## औरंगाबाद महापालिकेतील संचिका व रजिस्टर परत मिळण्याबाबत

**(३७) ४४६८९ (०५-१२-२०१८). श्री.सुभाष झांबड, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) औरंगाबाद महापालिकेतील २२१ संचिका व रजिस्टर शासनाच्या नगररचना विभागाने तीन महिन्यापूर्वी टिडीआर घोटाळयाच्या चौकशीसाठी ताब्यात घेतले असून सदर संचिका परत मिळण्याबाबत मा.मुख्यमंत्री महोदयांना पत्र देण्यात येणार असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ रोजी वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त संचिका व रजिस्टर नगररचना विभागाच्या ताब्यात असल्यामुळे टिडीआरचे काम बंद असून गुंठेवारी विभाग बंद करण्याचा निर्णय औरंगाबाद महापालिकेने घेतला असला तरी समाजोपयोगी आरक्षित जागेची खरेदी-विक्री सध्याही होत असल्याने नागरिकांची फसवणूक होत असल्याचेही निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही करण्यात आली वा येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (११-०३-२०१९) :** (१) औरंगाबाद महानगरपालिकेतील २२१ संचिका व रजिस्टर सहसंचालक, नगर रचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांच्याकडे तांत्रिक तपासणीकरीता आयुक्त, महानगरपालिका, औरंगाबाद यांचेकडून सादर केले आहेत. महापौर, औरंगाबाद महानगरपालिका यांनी दिनांक २०/०८/२०१८ रोजी मा.पालकमंत्री, औरंगाबाद यांना सदर संचिका परत मिळणेच्या अनुषंगाने पत्र देवून त्याची प्रत नगरविकास विभागाला दिलेली आहे.

(२) आयुक्त, औरंगाबाद महानगरपालिका यांनी दिनांक २६/१०/२०१८ रोजीच्या पत्रान्वये टिडीआर नोंदवही प्राप्त झाल्यास नवीन प्रकरणात टिडीआर प्रमाणपत्र प्रदान करणेची कार्यवाही करता येवू शकेल असे कळविलेले होते. त्यास अनुसरुन टिडीआर नोंदवहीची प्रत महानगरपालिकेकडून अधिप्रमाणित करून मूळ टिडीआर नोंदवही महानगरपालिकेकडे परत पाठविण्याच्या सूचना सहसंचालक, नगर रचना, औरंगाबाद विभाग यांना दिलेल्या आहेत. त्यामुळे नव्याने प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेल्या प्रकरणी अडचण राहणार नाही.

औरंगाबाद महानगरपालिकेमार्फत गुंठेवारी विभाग बंद करण्यात आलेला नाही.
(३) व (४) टिडीआर चौकशी संदर्भात सहसंचालक, नगर रचना, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद यांचेकडे उपलब्ध झालेल्या संचिका तपासणीचे काम जवळपास पूर्ण होत आले असून अंतिम टप्प्यात आहे.

---

## परभणी येथील रिलायन्स कंपनीच्या अवैध गौण खनिज उत्खननाबाबत

**(३८) ४५००० (३०-११-२०१८). श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, श्री.धनंजय मुंडे, श्री.सतिश चव्हाण, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) रिलायन्स जियो कंपनीने केलेल्या गौण खनिज उत्खनन गैरव्यवहार प्रकरणी कंपनीकडून रुपये २६ कोटींचा दंड वसूल करण्याबाबतचे आदेश जिल्हाधिकारी, परभणी यांनी माहे जुलै-ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान काढले आहेत, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, रिलायन्स कंपनीकडून दंड वसूल करण्यासाठी महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६६ च्या नियमाप्रमाणे सर्व कारवाई करण्यात यावी अशी मागणी परभणी येथील सामाजिक कार्यकर्ते यांनी अप्पर मुख्य सचिव, महसूल यांच्याकडे माहे सप्टेंबर-ऑक्टोबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान लेखी निवेदनाद्वारे केली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन रिलायन्स जिओ कंपनीकडून आर्थिक दंड वसूल करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (१५-०३-२०१९) :** (१) रिलायन्स जियो इन्फो कॉम.लि., या कंपनीस गौण खनिजाच्या अवैध उत्खननापोटी रुपये २५,९५,६३,७५०/- इतक्या दंडाच्या रक्कमेचे आदेश जिल्हाधिकारी, परभणी यांनी दिनांक ७/८/२०१८ रोजी पारीत केले आहेत.

(२) अशी बाब निदर्शनास आली नाही.
(३) जिल्हाधिकारी, परभणी यांचे दिनांक ७/८/२०१८ रोजीचे आदेश तसेच सदर रक्कम वसूलीबाबतच्या तहसिलदार, परभणी यांच्या दिनांक २२/१०/२०१८ रोजीच्या नोटीसच्या अंमलबजावणीस अपर विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांनी कंपनीने या विरोधात त्यांचेकडे दाखल करण्यात आलेल्या अपिलामध्ये दिनांक ३०/१०/२०१८ स्थगिती दिली आहे. सद्य:स्थितीत सदर अपील प्रकरण अपर विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचेकडे सुनावणी घेऊन निर्णयासाठी प्रलंबित आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## अमळनेर (जि.जळगांव) येथील पोलीस स्टेशनचे विभाजन करून तालुका तसेच शहर पोलीस स्टेशनची निर्मिती करणेबाबत

**(३९) ४५०२८ (०५-१२-२०१८). श्रीमती स्मिता वाघ :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अमळनेर (जि.जळगांव) येथील पोलीस स्टेशनचे विभाजन करून तालुका व शहर पोलीस स्टेशनची निर्मिती होणेबाबतचा प्रस्ताव प्रलंबित असल्याचे निदर्शनात आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर पोलीस स्टेशनचे विभाजन करून तालुका व शहर पोलीस स्टेशन निर्मिती होणेबाबतच्या प्रस्तावाचा समावेश दुसऱ्या टप्प्यात करण्यात आल्याचे निदर्शनात आले आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर पोलीस स्टेशनचे विभाजन कधीपर्यंत करण्यात येणार आहे तसेच विभाजन करणेबाबत शासनाची भूमिका काय ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-०३-२०१९) :** (१), (२) व (३) राज्य पोलीस दलामधील पद निर्मितीच्या दुसऱ्या टप्प्याच्या प्रस्तावामध्ये पोलीस अधिक्षक, जळगाव यांच्या आस्थापनेवरील अंमळनेर पोलीस ठाण्याचे विभाजन करून नवीन अंमळनेर ग्रामीण पोलीस ठाणे निर्माण करण्याची बाब समाविष्ट करण्यात आली आहे. सदर प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेस्तव सादर करण्यात आला असता

त्यावर वित्त विभागाने त्यांच्या दिनांक २५/०५/२०१७ च्या शासन निर्णयानुसार राज्य पोलीस दलाचा आकृतिबंध निश्चित करून प्रस्ताव फेरसादर करावा, असे अभिप्राय दिले आहेत. त्यानुसार पुढील कार्यवाही करण्यात येत आहे.

---

## यवतमाळ येथील "सरकार आपल्या दारी" या कार्यक्रमाबाबत

**(४०) ४५१६४ (३०-११-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) वासरी (ता.घाटंजी, जि.यवतमाळ) येथे "सरकार आपल्या दारी" या कार्यक्रमाचे माहे सप्टेंबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान आयोजन करण्यात आले होते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त कार्यक्रमात शासकीय अधिकारी गैरहजर राहिल्याने आदिवासी, कोलाम, पारधी, शेतकरी इ. गरीबांच्या प्रश्नांवर चर्चा न झाल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन गैरहजर अधिकाऱ्यांवर कारवाई करुन गरीबांचे प्रश्न निकाली काढण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२७-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) अध्यक्ष (अशासकीय), कै. वसंतराव नाईक, शेती स्वावलंबन मिशन, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली तसेच घाटंजी तालुक्यातील संबंधित विभागाचे कार्यालय प्रमुख/प्रतिनिधी यांचे उपस्थितीत दिनांक ०१/०९/२०१८ रोजी दुपारी २.०० वाजता मौजे वासरी कोलाम पोड, ता.घाटंजी, जि.यवतमाळ येथे "सरकार आपल्या दारी कार्यक्रमाचे" आयोजन करण्यात आले होते. तहसिलदार, घाटंजी यांनी सदरहू कार्यक्रमास संबंधित विभागाच्या अधिकारी/कर्मचारी यांना उपस्थित राहण्याबाबत दिनांक ३०/०८/२०१८ च्या पत्रान्वये कळविले होते. सदरहू कार्यक्रमात कार्यक्रमाचे अध्यक्ष यांनी वासरी कोलाम पोड येथील आदिवासी, कोलाम, पारधी, शेतकरी समाजाच्या समस्या जाणुन समस्याचे निराकरण

करण्यासाठी संबंधित विभागाच्या अधिकाऱ्यांना सूचना दिल्या होत्या. त्यानंतर कार्यक्रमाचे अध्यक्ष यांच्या परवानगीने "सरकार आपल्या दारी" हा कार्यक्रम संपल्याचे जाहीर करण्यात आले होते. सदरहू कार्यक्रमास संबंधित विभागांचे एकूण अंदाजे १६ शासकीय अधिकारी/प्रतिनिधी उपस्थित असल्याने कारवाईचा प्रश्न उद्भवत नाही.

---

## लातूर व सांगली जिल्ह्यातील शेतकऱ्यांना राष्ट्रीयकृत व जिल्हा मध्यवर्ती बँकाकडून कर्ज मिळाले नसल्याबाबत

**(४१) ४५६१४ (०५-१२-२०१८). श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) लातूर व सांगली जिल्ह्यातील शेतकऱ्यांना खरीप हंगामासाठी लागणारे कर्ज जिल्हा मध्यवर्ती व्यापारी व ग्रामीण बँकांनी उपलब्ध करुन दिले नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, कर्ज न मिळाल्यामुळे शेतकऱ्यांना शेती करणे अडचणीचे झाले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, शेतकऱ्यांना कर्ज उपलब्ध करुन देण्याबाबत शासनस्तरावरुन काय कार्यवाही केली करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (०५-०३-२०१९) :** (१) नाही.

(२) नाही.

(३) लातूर जिल्ह्यासाठी २०१८-१९ च्या खरीप हंगामासाठी रुपये १८७४.२६ कोटी पीक कर्ज वाटपाचा लक्षांक निश्चित करण्यात आला होता. त्यानुषंगाने जिल्हधिकारी, लातुर यांनी सहकार विभागाच्या यंत्रणेची मदत घेऊन खरीप पीक कर्ज बँकनिहाय नियोजन करुन लक्षांकाप्रमाणे खरीप पीक कर्ज वाटप पूर्ण करणेबाबत सूचना निर्गमित केलेल्या होत्या. त्यान्वये लातुर जिल्ह्यात १,८७,९३३ खातेदारांना रुपये ९१५.५७ कोटीचे खरीप पीक कर्ज वाटप करण्यात आलेले आहे.

सांगली जिल्हयात बँकांना सन २०१८-१९ च्या खरीप हंगामासाठी रुपये ११४९.८४ कोटीचा लक्षांक देण्यात आलेला होता. त्यानुषंगाने सांगली जिल्हयातील बँकांनी १,१९,२३० खातेदारांना रुपये ९७५.४० (८५%) कोटी पीक कर्ज वाटप केलेले आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्याचा जल आराखडा प्रलंबित असल्याबाबत

**(४२) ४५७५८ (०५-१२-२०१८). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **जलसंपदा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्याचा जल आराखडा प्रलंबित असल्याने नवीन धरण बांधता येत नसल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्याच्या एकात्मिक जल आराखड्याला अंतिम मान्यता कधीपर्यंत मिळणार आहे,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (०२-०३-२०१९) :** (१) अंशत: खरे आहे.

महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम २००५ च्या कलम ११(च) नुसार नवीन प्रकल्पाबाबतचे प्रस्ताव हे एकात्मिक राज्य जलसंपत्ती आराखड्याशी सुसंगत असणे आवश्यक आहे.

(२) गोदावरी खोऱ्याच्या एकात्मिक राज्य जलआराखड्यास मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखालील राज्य जल परिषदेच्या दिनांक ३०/११/२०१७ च्या ४ थ्या बैठकीत मंजूरी देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे कृष्णा खोरे, तापी खोरे, नर्मदा खोरे, कोकण पश्चिमवाहिनी नदी खोरे, आणि महानदी खोरे यांच्या एकात्मिक राज्य जल आराखड्यांना मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखालील राज्य जल परिषदेच्या दिनांक २२/०६/२०१८ च्या पाचव्या बैठकीत मंजूरी देण्यात आली आहे.

संपूर्ण राज्याच्या एकात्मिक राज्य जल आराखड्यास दिनांक १७ नोव्हेंबर, २०१८ च्या राज्य जल मंडळाच्या १५ व्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे व सदर आराखड्यास राज्य जल परिषदेची मान्यता घेण्याची कार्यवाही प्रगती पथावर आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## हिंगोली जिल्ह्यात संपूर्ण स्वच्छता मोहिमेंतर्गत शौचालये बांधण्याबाबत

**(४३) ४५७८८ (३०-११-२०१८). श्री.रामराव वडकुते, श्री.ख्वाजा बेग, श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **पाणीपुरवठा व स्वच्छता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) हिंगोली जिल्ह्यात संपूर्ण स्वच्छता मोहिमेंतर्गत ७७ हजार ४०० शौचालये बांधण्यात आली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अद्यापी ३६ हजार २०६ शौचालयाचे अनुदान लाभार्थ्यांना मिळाले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन लाभार्थ्यांना अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.बबनराव लोणीकर (२६-०२-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) व (३) स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) अंतर्गत हिंगोली जिल्ह्यात एकूण ७८,२२४ एवढे वैयक्तिक शौचालय बांधकाम पूर्ण झालेले आहे. त्यापैकी ४७५७४ लाभार्थ्यांना प्रोत्साहनपर अनुदान वितरीत करण्यात आले असून उर्वरीत ३०६५० लाभार्थ्यांना शौचालये अनुदान देणेबाबत कार्यवाही करण्यात येत असून रुपये २०.८९ कोटीचा केंद्र निधी अदयाप जिल्हास्तरावर उपलब्ध आहे.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबई पोलीस आयुक्त कार्यालयात घुसखोरी केलेल्या एका तोतया डीसीपीवर कारवाई करणेबाबत

**(४४) ४५९९१ (१५-०१-२०१४). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई पोलीस आयुक्त कार्यालयात स्वातंत्र्यदिनी एका तोतया डीसीपीने घुसखोरी करुन आयुक्तालयाची रेकी व क्राईम लॉकअपच पाहणी करण्यात येवूनही कुणालाच या घुसखोर तोतया डीसीपीचा संशय आला नसल्याची बाब निदर्शनास आली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास घुसखोर तोतया डीसीपीचा शोध घेण्याबाबत व त्यांच्यावर कठोर कारवाई करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) अद्याप, कोणतीच कार्यवाही करण्यात आली नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-०३-२०१९) :** (१) होय, अंशत: खरे आहे.

सेवानिवृत्त झालेले अपर उप-आयुक्त, (एक टप्पा पदोन्नती) श्री.अर्जुन बागडी यांनी सेवा निवृत्त झाल्यानंतरही पोलीस उप आयुक्तांचा गणवेश परिधान करुन बृहन्मुंबई पोलीस आयुक्त कार्यालयाच्या मुख्य प्रवेशद्वारातून खाजगी वाहनामधुन बेकायदेशीररीत्या प्रवेश केला तसेच गुन्हे शाखा सामान्य कोठडी या शासकीय इमारतीत आवश्यक परवानगी न घेता कोठडीतील आरोपीतांची पडताळणी केली आहे. सदर घटना सहाय्यक पोलीस आयुक्त (प्रशासन), गु.शा.गु.अ.वि. मुंबई श्री.बापु कटकदौंड यांनी केलेल्या चौकशीत निष्पन्न झाले.

(२) व (३) सेवानिवृत्त झालेले अपर उप-आयुक्त, (एक टप्पा पदोन्नती) श्री.अर्जुन बागडी यांच्याविरुध्द श्री.बापू कटकदौंड सहाय्यक पोलीस आयुक्त (प्रशासन) गुन्हे शाखा, यांच्या तक्रारी आझाद मैदान पोलीस ठाणे येथे गु.र.क्र. ४१/१५ (गु.प्र.शा.गु.र.क्र. ३८/१५) कलम १७० भा.दं.वि.सं. कलम १२०, १४९-ए महाराष्ट्र पोलीस कायदा १९५१ प्रमाणे गुन्हा नोंद करण्यात आला असून तो पुढील तपासकामी गुन्हे प्रकटीकरण शाखा, कक्ष-१ येथे वर्ग करण्यात आला होता. पो.नि.शेळके यांनी सदर गुन्ह्याचा तपास करुन आरोपी अर्जुन बागडी

यांच्याविरुध्द दोषारोप पत्र मा.अति मुख्य महानगर दंडाधिकारी, ३७ वे न्यायालय एस्प्लेन, मुंबई यांच्या न्यायालयात सी.सी.क्र.१४/पीडब्ल्यू/२०१७, दिनांक १७/०२/२०१७ रोजी सादर करण्यात आलेले आहे. सध्या गुन्हा न्यायप्रविष्ट आहे.

---

## समृध्दी महामार्गासाठी शहापूर (जि.ठाणे) तालुक्यातील संपादित करण्यात येणाऱ्या जमिनीसाठी अधिसूचना जारी करण्यात आल्याबाबत

**(४५) ४६११० (३०-११-२०१८). श्री.नागोराव गाणार, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास :** सन्माननीय **सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) समृध्दी महामार्गासाठी शहापूर (जि.ठाणे) तालुक्यातील संपादित करण्यात येणाऱ्या जमिनीसाठी अधिसूचना जारी करण्यात आली असून या अधिसूचनेनुसार संपादित करण्यात येणाऱ्या जमिनीच्या मालकांकडून किंवा हितसंबंधित व्यक्तींकडून २१ दिवसांच्या आत हरकती आणि सूचना मागविण्यात आल्याचे माहे जुलै, २०१८ च्या शेवटच्या आठवड्यात निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.एकनाथ शिंदे (१२-०३-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

महाराष्ट्र महामार्ग अधिनियमाच्या कलम १५ च्या उप-कलम (२) अन्वये जमिनीच्या संपादनाबाबत अधिसूचना दिनांक २६/०७/२०१८ रोजी शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यात आली आहे. सदर अधिसूचना “दैनिक लोकमत” मध्ये दिनांक ३१/०७/२०१८ व “दैनिक पुण्यनगरी” मध्ये दिनांक ०१/०८/२०१८ रोजी प्रसिध्द करण्यात आली आहे. सदर अधिसूचनेन्वये संपादित करण्यात येणाऱ्या जमिनीच्या मालकांकडून किंवा हितसंबंधित व्यक्तींकडून २१ दिवसांच्या आत हरकती आणि सूचना मागविण्यात आल्या होत्या.

(२) उपविभागीय अधिकारी तथा भूसंपादन अधिकारी, भिवंडी यांनी सदर अधिसूचनेच्या अनुषंगाने प्राप्त हरकती व सूचना सुनावणी घेऊन निर्णयीत केल्या आहेत. त्यानुषंगाने महाराष्ट्र महामार्ग अधिनियमाच्या कलम १८ च्या उप-कलम (१) अन्वये जमिनीच्या संपादनाची अंतिम अधिसूचना दिनांक ०५/११/२०१८ रोजी शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यात आली आहे. महाराष्ट्र महामार्ग अधिनियमान्वये जमीन व त्यावरील घटकांचा मोबदला निश्चित करण्याची कार्यवाही जिल्हाधिकारी, ठाणे व उपविभागीय अधिकारी, भिवंडी यांचेस्तरावर सुरु आहे. त्यानुषंगाने उपविभागीय अधिकारी तथा भूसंपादन अधिकारी, भिवंडी यांचेमार्फत सदर अधिनियमान्वये संपादनाचे निवाडे जाहीर करण्यात येतील.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुलांवर अभ्यासाचा ताण असल्याने मुलांच्या शारिरिक जडणघडणीवर त्याचा विपरीत परिणाम होत असल्याबाबत

**(४६) ४६१५८ (३०-११-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **क्रीडा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुलांवर अभ्यासाचा ताण असून त्यांना खेळण्यासाठी वेळ मिळत नसल्याने मुलांच्या शारिरिक जडणघडणीवर त्याचा विपरीत परिणाम होत असल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अभ्यास करणाऱ्यांना कोणत्याही प्रकारची अडचण येऊ नये आणि खेळ खेळणाऱ्यांना खेळता यावे अशाप्रकारे अभ्यासक्रमाचे नियोजन करण्याची आवश्यकता असून मुंबई सारख्या अनेक ठिकाणी मुलांसाठी खेळाची मैदाने शिल्लक नसल्याने त्यांच्या उपजत गुणांना प्रोत्साहन मिळत नाही, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०१-०३-२०१९) :** (१) हे खरे नाही.
(२), (३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यात शैक्षणिक महाविद्यालय कमी होत असतानाही नवीन महाविद्यालयांना मंजूरी देण्यात येत असल्याबाबत

**(४७) ४६२७३ (३०-११-२०१८). श्री.सुजितसिंह ठाकूर :** सन्माननीय **कृषी मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील जवळपास ५४ महाविद्यालयांचा शैक्षणिक दर्जा कमी होत असल्याचा अहवाल शासनास प्राप्त झालेला असतानाही शासन नवनविन महाविद्यालयांना मंजूरी देत असून सर्वाधिक कृषी महाविद्यालयांना मंजूरी देण्यात आल्याचे निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे, तसेच नवनविन महाविद्यालयांना मंजूरी देण्यामागची कारणे काय आहेत,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२६-०२-२०१९) :** (१) नाही, हे खरे नाही.
(२) मा.राज्यपाल महोदयांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १०/०७/२०१८ रोजी संपन्न झालेल्या बैठकीतील निर्णयाच्या अनुषंगाने चारही कृषी विद्यापीठांतर्गत “क” व “ड” दर्जाच्या विनाअनुदानित कृषी व संलग्न महाविद्यालयांच्या मान्यता व तपासणीबाबतचा अहवाल कृषी परिषदेकडून शासनास सादर करण्यात आला होता. सदर अहवालांच्या अनुषंगाने शासन स्तरावरुन, महाराष्ट्र कृषी विद्यापीठे अधिनियम १९८३ मधील कलम ४३ अन्वये विद्यापीठाच्या कार्यकारी परिषदेला महाविद्यालयांची संलग्नता पूर्णत: किंवा अंशत: अगर योग्य त्या बदलासह अशी संलग्नता मागे घेण्याच्या तरतूदीनुसार आवश्यक ती कार्यवाही करण्याबाबत कळविले आहे. त्यानुसार विद्यापीठस्तरावर कार्यवाही सुरु आहे.

सन २०१७-१८ च्या अर्थसंकल्पीय भाषणात मा.मंत्री (वित्त) यांनी सांगली व यवतमाळ येथे कृषी महाविद्यालय स्थापन करण्याची घोषणा केली

होती. तथापि, केवळ पारंपारिक कोर्सेस न ठेवता नविन तंत्रज्ञानाचा समावेश असलेले कोर्स सुरु करण्याच्या दृष्टीने, कृषी व पदुम विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-१५१८/प्र.क्र.९९(१)/७-अे,दिनांक २८/११/२०१८ अन्वये डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला अंतर्गत यवतमाळ येथे आणि शासन निर्णय क्र.संकीर्ण-१५१८/प्र.क्र.९९(२)/७-अे, दिनांक २८/११/२०१८ अन्वये महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी अंतर्गत पेठ, जि.सांगली येथे कृषी ऐवजी शासकीय अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय सुरु करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.
(३) प्रश्नच उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील विलेपार्ले पोलीस ठाण्याच्या हद्दीतील वृध्द महिलेचा छळ केल्याबाबत

**(४८) ४८२०५ (०४-०२-२०१४). श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील विलेपार्ले पोलीस ठाण्याच्या हद्दीत राहणाऱ्या रामलली गंगाप्रसादर मिश्रा या ५० वर्षे वयाच्या वृध्द महिलेल श्रध्दा राजकुमार पांडे (श्रध्दा मिश्रा) संतोष शुल्का तसेच कमलेश नायर मेहता स्वत:ला माजी मंत्री बबनराव पाचपुते यांचे स्वयंघोषित स्वीय सहाय्यक म्हणणारे व इतर यांचेकडून जीवे ठार मारण्याच्या धमक्या देवून तिचा छळ करीत असल्याची घटना दिनांक ८ एप्रिल, २०१३ रोजी घडली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, श्रीमती रामलली मिश्रा हिने रितसर तक्रार एन.सी.नं. ७३३/१३ दिनांक ८ एप्रिल २०१३ रोजी विलेपार्ले पोलीस ठाण्यात केलेली आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, आरोपींनी खंडणीसाठी तसेच प्रॉपर्टीसाठी तसेच घरातील वस्तू व कागदपत्रे यांची चोरी केली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, सदर प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय व तद्नुषंगाने संबंधितांवर कारवाई करणेबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) अद्याप संबंधित दोषीवर कोणतीच कारवाई न करण्याची तसेच दिरंगाई व टाळाटाळ करण्याची सविस्तर कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-०२-२०१९) :** (१), (२), (३) व (४) श्रीमती रामलली गंगाप्रसाद मिश्रा या वृध्द महिलेला श्रध्दा राजकुमार पांडे (श्रध्दा मिश्रा) हिने जीवे मारण्याच्या धमक्या दिल्याबाबत तिची मुलगी नामे पुजा गंगाप्रसाद मिश्रा हिने दिलेल्या तक्रारीवरुन विलेपार्ले पोलीस ठाणे येथे गु.र.क्र. ७३३/२०१३, कलम ५०४, ५०६ भा.दं.वि. अन्वये अदखलपात्र गुन्हा श्रध्दा राजकुमार पांडे (श्रध्दा मिश्रा) हिच्या विरोधात दिनांक ०८/०४/२०१३ रोजी नोंद करण्यात आला आहे. सदरचा अदखलपात्र गुन्हा संतोष शुक्ला व कमलेश नायर मेहता यांचे विरोधात नाही.

आरोपीने खंडणीसाठी अथवा मालमत्तेसाठी घरातील वस्तू व कागदपत्रे यांची चोरी केल्याची घटना घडलेली नाही.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात अकृषिक परवानगी मंजूर करण्याच्या कामाचे विकेंद्रीकरण करण्याबाबत

**(४९) ४८६०६ (३०-०१-२०१४). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात अकृषिक परवानगी मंजूर करण्याच्या कामाचे विकेंद्रीकरण करण्यासाठी महसूल विभागाने दिनांक ४ ऑक्टोबर, २०१३ रोजी सर्व जिल्हाधिकारी व अप्पर जिल्हाधिकारी यांना परिपत्रक पाठविले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अप्पर जिल्हाधिकारी ठाणे (जव्हार मुख्यालय) यांनी १० हजारांपेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या गावातील अकृषिक परवानगीसाठी चे अर्ज संबंधित उपविभागीय अधिकाऱ्याकडे तसेच १० हजारापेक्षा कमी लोकसंख्या असलेल्या गावातील अकृषिक परवानगीचे अर्ज संबंधित तहसिलदार यांच्याकडे अद्यापपर्यंत पाठविलेले नाही, हे ही खरे आहे काय,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (०८-०४-२०१९) :** (१), (२) व (३) महाराष्ट्र जमीन महसूल सहिता, १९६६ च्या कलम १३ (१) मधील तरतूद विचारात घेवून, अकृषिक

आकारणीस परवानगी देण्याबाबतच्या अधिकारांचे प्रत्यायोजन उपविभागीय अधिकारी अथवा यथास्थिती तहसिलदार यांना करण्याबाबत शासन परिपत्रक, क्र.संकिर्ण०२/२०१२/प्र.क्र४३/ई-१, दिनांक ४ ऑक्टोबर, २०१३ अन्वये सर्व जिल्हाधिकारी व अपर जिल्हाधिकारी यांना सूचना देण्यात आल्या आहेत.

त्यानुसार, जिल्हाधिकारी कार्यालय, पालघर यांचे परिपत्रक क्र.महसूल/कक्ष-१/टे-१/एल.एन.ए/अधिकारी/कावि-४४४/२०१५, दिनांक १६/४/२०१५ अन्वये क्षेत्र मर्यादेनुसार अकृषिक परवानगीच्या अधिकारांचे प्रत्यायोजन तहसिलदार, उपविभागीय अधिकारी, अपर जिल्हाधिकारी यांना करण्यात आले आहे. सदर प्रत्यायोजन हे लोकसंख्येच्या आधारे केलेले नसुन ते क्षेत्र मर्यादेनुसार केलेले आहे.

तथापि, आता महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ४२ ब मधील सुधारित तरतूद पाहता विकास आराखडा यामध्ये समाविष्ट असलेल्या जमिनीचा विकास आराखड्याप्रमाणे अनुज्ञेय असलेला वापर करण्यासाठी आता अकृषिक परवानगीची आवश्यकता राहिलेली नाही. तसेच कलम ४२ क मधील तरतुदीनुसार प्रादेशिक योजनेत समाविष्ट भागात महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ च्या तरतूदीप्रमाणे बांधकाम परवानगी घेतल्यास स्वतंत्रपणे अकृषिक परवानगी घेण्याची गरज राहिलेली नाही.

---

## राज्यात ॲसिड हल्ला झाल्यास व त्या ॲसिड हल्यात मृत्यू झाल्यास त्या व्यक्तींच्या कुटुंबियांना नुकसान भरपाई देण्याबाबत

**(५०) ५१५९९ (०३-०७-२०१४). श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात ॲसिड हल्ला झाल्यास व त्यात ॲसिड फेकला गेलेल्या व्यक्तींचा मृत्यू झाल्यास मृत व्यक्तींच्या कुटुंबियांना नुकसान भरपाई देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्यानुसार आतापर्यंत किती व्यक्तींच्या नातेवाईकांना नुकसान भरपाई देण्यात आली आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१३-०३-२०१९) :** (१) "महाराष्ट्रात बळी पडलेल्या व्यक्तींकरीता नुकसान भरपाई योजना, २०१४" ही दिनांक ११/०४/२०१४ पासून महाराष्ट्रात राज्यात अंमलात आली आहे. योजनेखाली (१) जिवित हानी, (२) कायमस्वरुपी विकलांगता आणि (३) ॲसिड हल्ला, या तीन हानी अथवा इजा यांचा समावेश होता. "महाराष्ट्रात बळी पडलेल्या व्यक्तींकरीता नुकसानभरपाई (सुधारणा) योजना, २०१७" द्वारे मुख्य योजनेत सुधारणा करण्यात आल्या असून आणखी आठ हानी किंवा इजा यांचा समावेश करण्यात आला आहे. तसेच (i) ॲसिड हल्ला व (ii) बलात्कार याच्या बळी पडलेल्या व्यक्तींकरीता नुकसान भरपाईची रक्कम रुपये ५,००,०००/- इतकी निश्चित करण्यात आली आहे.

(२) उक्त योजनेखाली आतापर्यंत तीन बळी व्यक्तींच्या नातेवाईकांना नुकसान भरपाई देण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**जितेंद्र भोळे**
**सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.